






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






२७३०

वर्ष ११वे - १९३८.

अं. ४१-४२-४३-४४.

संपादक - मोहन ज्ञानेश्वर शहाणे

वर्ष ११ वे अंक १ (४१) फेब्रुवारी १९३८
वर्ष ११ वे अंक २रा (४२) एप्रिल १९३८
वर्ष ११ वे अंक ३रा (४३) जुलै १९३८
वर्ष ११वे अंक ४था (४४) ऑक्टोबर १९३८

अनुक्रमणिका



महाराष्ट्र साहित्य परिषद्, पुणें

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

[ त्रैमासिक ]

## ४२

संपादक—मोहन ज्ञानेश्वर शहाणे
( सदस्य, सर्व्हंण्टस् ऑफ इण्डिया सोसायटी )

चैत्र १८६०

वर्ष ११ वें ] ऍप्रिल १९३८ [ अंक २








# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

वर्ष ११ वें ]

## अनुक्रमणिका

[ अंक २ रा


| विषय | पृष्ठ |
|---|---|
| १ "वैनायक" वृत्तविचार : श्री. ना. ग. जोशी, अेम्. अे. | ६५ |
| २ महाराष्ट्र सारस्वतांतील मद्रविभाग : श्री. चिं. ग. कर्वे, बी. अे. | ७६ |
| ३ चर्चा— रोमन किं नागरी : श्री. भा. वि. जाधव, श्री. ना. के. बेहरे, श्री. चिं. ग. कर्वे, श्री. शं. दा. पेंडसे, श्री. अेस्. सत्यमूर्ति, 'महाराष्ट्र' | ७९ |
| ४ कुडाळी म्हणींची चर्चा : श्री. श्री. म. वर्दे, बी.अे., अेल्अेल्.बी. | ८८ |
| ५ साभार स्वीकार | ९१ |
| ६ कुडाळी लोककथा : श्री. वा. रा. प्रभु, बी. अे. | ९२ |
| ७ साहित्यिकांचे विचार : श्री. गो. कृ. मोडक, श्री. शं. के. कानेटकर, श्री. बा. त्र्यं. हरदास, श्री. ग. त्र्यं. माडखोलकर | ९५ |
| ८ परीक्षणें— व्यक्ति आणि वाङ्मय : श्री. गंगाधर भा. निरंतर | १०० |
| ९ पत्रव्यवहार— शास्त्रीय परिभाषा : श्री. शा. पु. कान्हेरे.—लिपिसमिती निर्णय : श्री. श्री. ल. पांढरीपांडे | १०३ |
| १० स्त्रियांच्या म्हणी : श्री. नी. शं. नवरे | १०५ |
| ११ संपादकीय | १०६ |
| १२ वाङ्मयवार्ता | १०७ |
| १३ बंधमुक्त वाङ्मय (मध्यप्रांत) | १०७ |
| १४ डे. व्ह. ट्रा. सोसायटी (बक्षीस दिलेल्या पुस्तकांची यादी) | १०८ |
| १५ परिषद्वार्ता— वृत्तांत, नवीन सभासद, यशस्वी उमेदवार | ११० |
| १६ २१ व्या (जळगांव) म. सा. सं. ठरावांच्या अंमलबजावणीचा वृत्तांत | ११३ |
| १७ म. सा. परिषदेचें १९३७ चें इतिवृत्त, जमाखर्च, अंदाजपत्रक | ११५ |
| १८ महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या परीक्षा | १२१ |


———

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

म. सा. परिषद्
अध्यक्ष
श्री. न. चिं. केळकर
कार्याध्यक्ष
श्री. वा. म. जोशी

या अंकांत स्वाक्षरीने प्रसिद्ध होणाऱ्या कोणत्याहि लेखांतील मतांबद्दल महाराष्ट्र-साहित्य-परिषद् उत्तरदायी नाही. हे लेख चर्चात्मक दृष्टीनेच प्रसिद्ध केले आहेत.

कोपाध्यक्ष
श्री. ध. रा. गाडगीळ
चिटणीस
रा. सा. र. लु. जोशी
श्री. ना. के. बेहेरे

वर्ष ११ ] संपादक—मोहन ज्ञानेश्वर शहाणे [ अंक २

# "वैनायक" वृत्त-विचार

लेखक :— नारायण गजानन जोशी, एम्. ए., सिहोर, काठेवाड.



अिंग्रजी 'निर्यमक छंदा'ला—blank verse ला, मार्लोसारख्या कांही गोष्टींत शेक्सपीअरच्या तोडीच्या नाट्यकाराने आपल्या नाटकांतून स्थान देतांच त्याचा तत्कालीन साहित्यपुंगव अुपहास करूं लागला, आणि त्या अुपहासाच्या तडाख्यांतून मिल्टनसारखा (पुढे) जगद्विख्यात महाकवीसुद्धा सुटला नाही. ड्रायडनसारखा रसिक चाहतासुद्धा Paradise Lost चें जुन्या वीरकाव्यांच्या 'दुचरणी' पद्यांत (heroic couplet) वृत्तान्तर करूं पाहत होता !! कांहीशी तशीच स्थिति प्रारम्भीं 'वैनायक'–निर्यमक वृत्ताचीहि झाली. अेरव्ही प्रागतिक नि अुदारमतवादी असून विविध ज्ञानाचा विस्तार निष्ठेने करणाऱ्या महाराष्ट्राच्या ज्येष्ठ मासिकाने त्याचा निर्दय अुपहास केला.[१] पण पुढे विदर्भीय तरुण रसिकांनी त्याचा अुहापोह करून गौरव केला,[२] आणि आता तर मराठीच्या सर्वश्रेष्ठ छन्दःशास्त्रज्ञाने त्या वृत्ताच्या कामगिरीसाठी त्याची योग्य स्तुतिहि केली आहे.[३]

पण श्री. सावरकरांचें मिल्टनशीं असलेलें साधर्म्य येथेच संपत नाही. कित्येक मूलभूत महत्त्वाच्या गोष्टींत त्या दोन कवींत साम्य आहे. दोघांचें पहिलें राजकीय लेखन नि नंतरची महाकाव्यलेखनासाठी होत असलेली तळमळ; दोघांच्या त्यागी जीवनाचा त्यांच्या लेख-

---

१ 'गोमांतक' काव्याची 'वि. ज्ञा. विस्तारां'तील पोंच नि त्या वेळचीं विधानें पाहा.

२ श्री. वा. ना. देशपांडे, श्री. अनिल, श्री. माडखोलकर.

३ "छन्दोरचने" (नवीन) मधील 'धवलचंद्रिका' जातींसंबंधी विवेचनांत.

नावरील परिणाम; दोघांची वक्तृत्वयुक्त लेखनरीति; दोघांचें राजकीय नि सामाजिक प्रचारकी निबंधलेखन; आणि अन्तींचें blank verse नि 'वैनायक' या वृत्ताचें अुदात्तीकरण या सर्व समान घटना या विधानाची साक्ष पटवतील. या अंतिम विशेषाशीं प्रस्तुत लेखांत विशेष संबंध येणार आहे. कारण मिल्टनच्या छन्दोरचनेंतील 'बहुतेक' गुण श्री. सावकरांच्या पद्यरचनेंत आढळून येतात. आणि ते विशेष त्या वैनायकांत आहेत म्हणूनच मिल्टनच्या महाकाव्याचें भाषान्तर वैनायक या अेकमेव वृत्तांत होअू शकत आहे.

स्वतःच्या पद्यरचनेविषयीचें मिल्टनचें म्हणणें या दृष्टीनेच विचारार्ह ठरतें :

"The measure is English heroic verse without rime, as that of Homer in Greek and Virgil in Latin; rime being no necessary adjunct or true ornament of poem or good verse, in longer works especially, ......which consists only in apt numbers, fit quantity of syllables, and the sense variously drawn out from one verse into another, not in the jingling sound of the like endings.... This neglect of rime so little is to be taken for a defect though it may seem so perhaps to vulgar readers that it rather is to be esteemed an example set, the first in English, of ancient liberty recovered to heroic poem from the troublesome and modern bondage of riming."

निर्यमक 'वीरकाव्यछंद', साघात-निराघात अक्षरांची अनुरूप योजना, अेका चरणांतून दुसऱ्यांत विविधरीत्या प्रवेशणारा अर्थौघ, हे विशेष मिल्टनने स्वतः अुल्लेखिलेच आहेत. त्याव्यतिरिक्त, परिणामलक्षी यतियोजना, अर्थ-भाव-विचारादींचें ध्वनन करणारी शब्दध्वनि-नियोजना, अभिजात-लॅटिन-शब्दप्राचुर्य आणि सर्वांत प्रमुख असा पद्य-परिच्छेदांचा (verse paragraphs) चतुर विलास, हे विशेषतः मिल्टनचे मिल्टनीय (Miltonic) काव्यगुण आहेत. या सर्व काव्यविशेषांचा अुपयोग श्री. सावरकरांच्या "वैनायकी" रचनेंत केलेला आपणांस आढळून येतो.

या दोनहि कवींच्या साम्यस्थलांचें अितकें दर्शन झाल्यावर कांही विषमस्थलांचेंहि चिन्तन आपणांस करणें प्राप्त आहे. सर्वांत महत्त्वाचा भेद म्हणजे प्रकृतिभेद. सावरकर प्रथम कर्मयोगी आहेत; काव्य हें त्यांच्या कार्याचें अुपांग आहे. अुलट मिल्टन या व्यक्तीपेक्षा त्याच्या महाकाव्याचें महत्त्व अधिक आहे. साहजिक मिल्टनने काव्याच्या रचना-रीतींकडे अितकें सूक्ष्म लक्ष दिलें की, "मिल्टनीय" हें आंग्लकाव्यांतलि सर्वश्रेष्ठ "रीती"चें (style) अभिधान झालें.

श्री. सावरकरांनीहि आपल्या "वैनायक" छंदाविषयीच्या लेखांत त्यांच्या काव्यावर मिल्टनचा परिणाम घडल्याचें ध्वनित केलें आहे. मुळी "वैनायक" वृत्त हें मिल्टनच्या 'निर्यमक' छंदासारखें म्हणूनच सावरकरांनी संस्कारिलें आहे. या दोनहि छंदांत

"...विशाल विचार संपेतों विराम लांबवितां येतो. अनेक लहान अुपवाक्यांनीं गुंफलेली वक्तृत्वपूर्ण दीर्घ वाक्यें, त्यांची गोड गुंफण वा गंभीर प्रवाह फारसा खंडू न देतां, त्यांत साधतां येतो. Paradise Lost या मिल्टनच्या महाकाव्यांतील या

Blank Verse च्या वृत्तांत गुंफलेली सैतानाच्या राजसभेंतील किंवा 'ईश्वराच्या देवसभेंतील" (किंवा सैतानाचीं स्वगत) "वक्तृत्वशाली भाषणें वाचलीं असतां हा लाभ अशा वृत्तानें कसा साधला जातो तें चटकन ध्यानांत येईल..."—'रानफुलें' परिशिष्ट.

सद्यःकालच्या महाराष्ट्रांत सावरकर स्वतः अद्वितीय वक्ते म्हणून गणले जातात. १९०८ चें परदेशी कापडाच्या होळीसमयींचें; रत्नागिरींतील "कृष्ण-जन्म-रहस्या"वरचें; तेथीलच नेपाळच्या महाराणांच्या स्वागतप्रसंगींचें, किंवा परवाचें पुण्याचें त्यांच्या सत्कारसमारंभांतील सहस्रावधि जनसमूहापुढील अस्खलित वक्तृत्व, मिल्टनच्या blank verse शीं समानगुण असणाऱ्या "वैनायकांतच" गुम्फणें शक्य आहे. या महाराष्ट्रभाटाचें "गोमान्तक" काव्यांतील वक्तृत्व पाहा : पानपतच्या समरापूर्वीचें कार्य अुल्लेखून तो पुण्याचा राजदूत म्हणतो :

...तुरकाण सर्प तो
झोडुनिया, तोडुनिया, पचवुनिया तें
विष दुर्धर टाकण्यांतची स्वशक्तिचा
व्यय करणें अद्यावधि भाग जाहलें;
विश्वनाटकांतिल या दृश्य कोणतें
आगामी अंकाचें, तें न कवणही
कथुं शकेल निश्चिततः आज !...इत्यादि. गो. अु. ११३०-३६.

श्री. सावरकरांचें दुसरें काव्य 'मूर्ति दुजी ती : २" (अर्थात् "अमरमृत" वीर बंदा) हें या वक्तृत्वशैलीचें निर्विवाद अुदाहरण आहे. श्री. सावरकर जेव्हा ती कविता स्वतः वाचून ('गाअून' नव्हे) दाखवितात तेव्हा, खरोखर, अभिमन्युवधाचा महाभारतीय भाग जेव्हा श्रीव्यास भगवान गणेशांना कथन करते झाले, किंवा ग्रीक अर्जुन ॲचिलिसचा सुततुल्य सुहृद मारला गेला त्या वेळचें "ओलियड"मधील वर्णन जेव्हा महाकवि होमर स्वतः वाद्यतंत्रीच्या साथीत गाअून दाखवीत होता, त्या प्रसंगांचें स्मरण झाल्याविना राहात नाही. वक्तृत्वपूर्ण कथन, वर्णन हा सावरकरी काव्याचा आत्मा असल्यामुळें ओघवती धांवती रचना ज्या वृत्तांत शक्य आहे असें "वैनायक" वृत्तच त्याला अनुरूप आहे.

या वृत्ताचा दुसरा गुण म्हणजे संभाषणसुलभता. "गोमांतकां"तील वर अुल्लेखिलेलें "महाराष्ट्रभाट" राजदूतांचें भाषण जसें वैनायकाची भाषणसुलभता दाखवितें, तसेंच त्याचें स्वतःचें जीवनवृत्त त्या वृत्तांची संभाषणसुगमता दृष्टोत्पत्तीस आणतें. वानगी म्हणून खालील अुतारे देतां येतील.

"काय कथूं ! | कोठुनिया ! | तरिहि आपुली
आज्ञा ती, म्हणुनि कथन विहितची असे !
बंधूनो ! | आहे मज मित्र अेक जो ×××
××× तो माझा मित्र एक दिवशिं शैशवीं
आअीच्या पदरासी धरुनि 'चल नं तूं !—
गेहासी चल नं !' अशा त्रोतव्या वचीं
होता जों ओढित—" गो. अु. १६५०–६२

हा मित्र मृत नाहींच, पण स्वतः राजदूतच आहे, हें वृत्त समजतांच त्या वेळच्या बुवासंस्थेचा

आचार्य शुक्र गडबडला, कारण त्यानेच त्या राजदूताच्या–शंकरच्या–मृत्यूची नि सन्त निनामी बावांच्या चमत्काराची गप्प अुठविली होती. हा त्या शुक्राचा नि शंकरचा संवाद पाहा;

शुक्र म्हणतो :—

"××× सत्य अुभयही
होअूं शकतील कथा अन्य पुरासी
भार्गव हें नांव असे. तेथिचा कुणी
हा असेल मित्र राजदूत ! आपुला
शंकर या नामें जो सागरीं बुडे."
"दुर्दैवें | तो न बुडे | " दूत अुत्तरे,×××
गर्जत त्या शुक्र पुसे, "तो कुठें असे !
आणा त्या | स्पष्ट कथा | संत निनामी—
बावांची | शपथ तुम्हां | चुकतसां तुम्ही "
अषित् हांसोनि अुपेक्षास्वरीं वदे
राजदूत | "पुसतां मज तो कुठें क्से !
अैका तरि | शंकर तो | या स्थलीं असे !
हा येथे | माझ्यांतचि | मित्र जिवाचा
माझा तो मीच होय | तनय रमेचा !"

या सर्व अवतरणांचा छन्दःशास्त्रदृष्टीने विचार करतां आपणास आढळून येअील की, ही सम्भाषणसुकरता विशिष्ट यतिपालनामुळे आली आहे. वैनायकाची रचना भृंगावर्तनी आहे. तीन भृंग नि शेवटचें गुरु अक्षर मिळून वीस मात्रांची ही पङ्क्ति होते. प्रत्येक भृंगानन्तर (सहा मात्रानन्तर) यति येतो. या यतींची योजना योग्य रीतीने केल्यामुळेच संवाद अितके नैसर्गिक वाटतात. वरील अुताऱ्यांत चटकन् ध्यानीं येणारे यति अुभ्या रेघांनी दर्शविलेले आहेत. ते पाहिले म्हणजे याविषयी निश्चिती पटेल.

वक्तृत्वासाठी सुद्धा कांही विशिष्ट रचना अधिक अनुरूप आहेत असें दिसून येअील. खालील अुताऱ्यांत (–⏑) कँ मॅ अशी मात्रावलि आहे तीच खरोखर अतिशय स्वाभाविक अशी वैनायक पङ्क्तिरचना आहे. दुसरी रचना म्हणजे भृंगाच्या सहा मात्रा तीन गुरूंनी गुंफणें. यामुळे खोल, पल्लेदार, नि प्रसङ्गीं कठोर अुद्गार शक्य होतात; आणि सावरकरांच्या, जळते स्फुलिङ्ग पसरविणाऱ्या, वक्तृत्वाला या दोन पद्धतीच सर्वांत अधिक अनुरूप आहेत.

क्रूर लोह | –पञ्जरात | या निरुन्दशा
तीक्ष्ण सुळे | लोहाचे | दात रक्त-पी

(मूर्वि दुजी तीः २)

यांतील पहिल्या ओळींत कठोरता आली आहे तर

हे अनन्त | अुच्च विरल | नील अम्बरा
हे अनन्त | खोल विरल | नील सागरा

गो० अु. | २११२०

या पङ्क्तिद्वयांत प्रशान्त नि भव्य वातावरण प्रायः (–⏑) रचनेमुळेच आलें आहे. याच ओळी आणखी दोन विशेषांनी युक्त आहेत. कोमल-कमनीय पदावलि आणि क्वचित् मंजुलता वाढविण्यास साहाय्यभूत होणारी यमकयोजना. श्री. सावरकर यासम्बंधी लिहितात:

"दोन तीन चरणांतच सम्पेल अशा विचार जर आला नी त्यायोगें अशा सन्निधच्या अन्तरावरच विराम पडला तर यमक घालावयासहि हरकत नाही. तो (तें!) या वृत्तालाहि अशा स्थलीं शोभतो." जसें

शंभरदा | पढून ऊठे | रानटी स्वरीं
'होशी का मुसलमान! | वांचशी तरी!'
शंभरदा | उत्तर दे | कंप अंबरीं
'हिन्दू मी | शीख अम्ही | मरण मी वरी!'

या चरणस्तवकांतील 'लग'ची रचना नि यतिपालना पाहण्यासारखी आहे. पहिलें नि शेवटचें अक्षर नेहमी गुरु; संभाषणवाक्यांत दीर्घाक्षरांचें प्राचुर्य आणि यतींवरें खटके यामुळे ओजस्विता पूर्णपणें साधली आहे. (–⏑⏑–) या गणामुळे कंपध्वनि निर्मिला जातो.

तिन्ही गुरूंच्यामुळे आघाताची निर्मिती होते. अशा रचनेचीं उदाहरणे. अनेक देतां येतील. ही "मरणोन्मुख शय्येवर"ची प्रथम पङ्क्ति पाहा.

ये मृत्यो ये तूं ये यावया प्रती

तशाच या "गोमांतकां"तील (१८२०) ओळी घ्याः

ज्या ज्या स्त्री |-प्रति अविंध | पळवुनी बळें
आस्कंदी | ती ती स्त्री | भ्रष्ट ना, परी.
भ्रष्ट' तिचा | पतिच होय

गुरु लघूंचा वा लघु गुरूंचा अनुक्रम आणि केवळ दीर्घ अक्षरें या दोन .ओजोगुणसाधक रचनेप्रमाणेंच माधुर्य आणि प्रसाद साधण्यासाठी श्री. सावरकर लघूंची मनोरम संयोजना करतात. 'मूर्ति दुजी ती : १' मधील हें पंक्तियुग्म पहिल्यांदा गांभीर्य आणि लगेच मार्दव प्रतीत करतें.

समर चण्डि | का चरणसु |–पंडिलावरी
निज सुन्दर | मुखमण्डल | कमल कुसुमसे

दुसऱ्या पंक्तींत किती श्रुतिमाधुरी आहे! आणि पहिलींत किती गंभीरता आहे! या चातुरीचें मूळ खरोखर जसें लघूंच्या मध्येच गुरु अक्षराची स्थापना आणि तें गुरु अक्षर अनुनासिक असणें या गोष्टींत आहे तसेंच पहिलींतील स, र, ड, क, इत्यादि कठोर व्यंजनांत' आणि दुसरींतील, ज, द, ल, न, म यांसारख्या कोमल व्यंजनांत आहे, यांत शंका नाही.

अनुक्रमणिका

मार्दव-माधुर्याप्रमाणेच, 'हुरहुर लागणें' यासारख्या हळुवार भावनांसाठीहि लघूंची योजना केलेली आहे: लिलि आणि शंकर यांच्या प्रणयाचा अंकुर नि नंतरची हळुवार अुत्सुकता या खालील ओळींत नाही दिसत !

अनुदिन मग | जात पथ. | त्या किशोर तो
अनुदिन तिज | बघत कधीं | वदत अल्पसें. —गो. अु. २२३

'घुसण्या' ची त्वरा आणि हृदयाच्या कंपांची त्वरा खालील छेदकांतील पहिल्या दोन ओळींत जशी श्रुतिगोचर होते तशीच संभ्रमयुक्त स्वरांतील कंपस्पंदनासुद्धा त्यापुढील पंक्तींत अनुभूत होतात.

अहह कवण | तरि हा ये | घुसत सुन्दरी
आलिंगू | आगींतहि | नृवर नोवरी !

ही संदरी दुसरी कोणी नसून तोफेच्या तोंडीं दिल्या जाणाऱ्या शंकराची त्यागी प्रेयसी लिली आहे. यापुढील शंकराच्या अुद्गारांत जसा संभ्रम, गोंधळ आणि कंप आहे तसाच आंतलि हृदयाच्या हाकेला 'ओ' मिळाल्यामुळे होणारा अननुभूत हर्षचीत्कारहि नाही का ?

"लिलि ! हो हो | दूर, लिली | कमलकोमले
सत्य सत्य | रतिरंगीं | कमलकोमला
ज्वालांच्या | जैं हुताश | परिरथीं चढे
स्वाहा तैं | रणरंगीं | वज्र कठोरा." गो. अु. २५७९-८४.

हीच लघूमुळे येणारी कोमलता, शब्दांच्या ताल-ध्वनींचा रुमझुमाट, आणि विरुद्ध-पक्षी रुद्राच्या तांडवासारखी कठोर छंदोरचना यांचा संयोग 'मूर्ति दुजी ती १' यांतील खालील अुताऱ्यांत अपूर्वपणें दृष्टीस पडतो. खरोखर हा सर्वच प्रथमार्ध म्हणजे मार्दव नि कठोरता, भोग नि त्याग, यांमधील विरोध कसा अवश्यंभावी आहे, तरीहि कसा नैसर्गिक आहे हेंच दाखवितो.

परि यमुनापुलिनीं रसभरित कीं अशा
त्या कवळ्या नंदकिशोराचिया मअू
लुसलुशीत अधरांवरि मधुर होतसे
मुरली, जी | तीच अहा त्याच कोमला
अधरांवरि कर्कश रणशृंग होअुनी
रणवेताळाच्या वेताळतांडवा
ताल पिटी भारतीय त्या रणामधें —
दंष्ट्राविक्राळ गर्जे भयद कोण तो —

हा सबंध परिच्छेद—की ज्यांतील अुतारा वर दिला आहे—श्री. सावरकरांच्या पल्लेदार (periodic) पद्यरचनेचा नमुनाच आहे. मिल्टनच्या काव्यांतील हा विशेष श्री. विनायकरावांनी

पूर्ण आत्मसात् केला आहे. खालील तीन अुतारे नि त्यांचें पृथक्करण सावरकरांच्या छन्दोरचनेचें मर्म समग्रपणें बिंबवितील म्हणून तेवढेच देअून हें अवतरणांचें चन्हाट बांधून ठेवूं.

पहिल्या अुताऱ्यांत शुकबुवा मागे अुल्लेखिलेली गप्प अुठवीत आहेत :

(१) विप्रज मी | शुकनाम. | साधुसेवनीं
ने जीवन. | ज्या कालीं. तीन वत्सरा–(त्रुटित शब्द)
मागें, या | गांवीं आक्रांत होअुनी (अल्पविराम pause)
सज्जनांसि | पुर्तुगिजें | जाळिलें जितेः(अन्तविरामend-stop)
त्या कालीं परिसुनि तो | संत निनामी–(त्रुटित शब्द)
बावांचा | अंत घोर, कष्टलों बहु, (अल्पविराम)
अंतीं ये | चित्तीं कीं | तोंवरी जसें
जीवन मी त्यांसीची ने विचारूनी
तेंवी त्यावरतीही त्यांप्रतीच कीं
जिज्ञासिन | कवण कार्य | यापुढेंहि तें (अल्पविराम)
म्हणुनी मी निरशन राहूनि घेतलें
धरणें शिवमन्दिरांत, निबिड अरण्यीं
तों नवव्या दिवशीं दृष्टान्त मज घडे

संगमाच्या स्थलीं वर्षाकालीं जसे पाण्याचे लोंढे अेकमेकांत घुसतात, क्वचित् तीरावर आपटून अल्पविराम पावतात, तर कांही वेळ विरुद्ध प्रवाहांनी अडविले जाअून स्तब्ध होतात, आणि अन्तीं घो घो आवाज करीत, गधूळ प्रवाहांत महासागरांत मिसळतात, तशा येथील ओळीहि अेकमेकांत घुसत आहेत, थबकत आहेत, निस्तब्ध होताहेत आणि खळखळाटहि करीत असून अन्तीं काव्यौघांत विराम पावत आहेत. यति; चरणान्तींच्या भृंगावर्तींतील (–‿ – ‿ | –) ही रचना; दीर्घाक्षरें; अल्पविराम (pauses); अन्तविराम (end-stop) आणि धावती पंक्तिरचना (run-on lines); या सर्व गोष्टींमुळे विचाराच्या दृष्टीने सामान्य असूनसुद्धा हा भाग कन्टाळवाणा वाटत नाही. मिल्टनने असलेच खाचखळगे (pit-falls) अशाच आकर्षक छन्दोरचनेने चुकविले आहेत.

आणि हा दुसरा पद्यच्छेद तर आपणांस कालिदासीय प्रसादयुक्त वर्णनशैलीची आठवण देतो, किंवा मिल्टनच्या नंदनवनवर्णनाची स्मृति करवितो. यांतील अभिजात संस्कृत महाकाव्यांची छटा, मिल्टनच्या लॅटिनप्रचुर रचनेशीं समानशीलच आहे :

(२) पुष्पलतापादपसंकीर्ण पुराण–
प्रथित तपोवन होतें सिंधुतटासी.
वेलावलिशोभित पुन्नागसुगंधी
कोकिलादिखगकूजित, मृगमनोज्ञशा
त्या तपोवनांत तीर्थ अेक शोभलें
स्वच्छ सलिल सलिलजपरिवेष्टनामधें
नारिकेल-आम्र-पनस-पूग-कर्दली-

अनुक्रमणिका

तरुलता स्वभाक्ति-भरें गुंफुनी निजा
शाखांसीं डवडवल्या फलफुलांमधें
रचिति रम्य मंडपास अुंच अंबरीं
तीर्थाच्या रविकिरणोज्ज्वल जलापरी.

आणि ही पाहा मिल्टनची वनराजि आणि विशिष्ट तरुनामांची मालिका

overhead up grew
Insuperable highth of loftest shade,
Cedar, and pine and fir, and branching palm
A sylvan scene, and, as the ranks ascend
Shade above shade, a woody theatre
Of stateliest view. (Paradise Lost, IV. 138-142)

आणि त्याचेंच हें मराठीकरण पाहाः

माथ्यावरि बहु वाढे अतुल-तुंगशी
अुंची सच्छाय देवदारु-खदिर-वा-
-साग; झांप झुलते ज्यां हस्तसे तयां
ताडांची, वन्य दृश्य हें; अणी, जशा
रांगा अुंचावतांच, अेक साअुली
साअुलीवरून दुज्या, वन्य रंगभू
राजविभव दर्शनीय. (नष्टनन्दन : ४)

अन्तींचा अुतारा 'गोमान्तका'च्या त्या दोन त्यागी जीवांच्या मीलनाने पुनीत झालेला आहे. मोरोक्कोंत दासी म्हणून विकलेली पुर्तुगीज किशोरी लिली तेथेच दास म्हणून विकलेल्या हिन्दु किशोराला—शङ्कराला—गुप्तपणें सुटकेसाठी पत्र लिहिते आणि शङ्करहि तिला पाहिजे तेंच अुत्तर पाठवितो आहेः

(३) " गोड किशोरा !
येशिल तूं तरि जाअूं सत्य सुटोनी
परि येशिल ना, तरि तुजवीण मुक्तते-
हुनि मी हें सुखद दुष्ट दास्यची गणीं.
राहिन येथेंचि अुभी विपल देखण्या
जातां तूं या पथें असा कधीं कधीं
मम कोमल लोभाचें बिम्ब त्या तुझ्या
अुद्ग्रीवा कमललोचनांत देखण्या."

या पत्रावरील कवीचें रसिक भाष्य पाहा :

शब्दमेघ ते द्रवुनी पत्रिकेंतले
स्वातीचे अर्थबिंदु टपकतांच तो
हृदयाच्या शिंपल्यांत झेलुनी घरी
आणि लिही तिज परतें : "हे शुचिव्रते !
येतों मी तुजसंगें सांगशी तिथें

जीवनीय अन्धःकारांत माझिया
मजसि दिसूं ज्या तुझिया स्निग्ध शीतला
हास्याच्या मंजु अुजेडांत लागलें
त्या तुझिया मुक्त संगतींत अेक जो
दिन जाइल तो जीवन सफलवुनी या
मज मरण्या सिद्ध करिल !—युगहि ना इथें !"

या अवतरणांतील ललितभावार्थाचे मुक्तामणि शब्दांच्या सुंदर शुक्तिमालिकेंत अितके परस्परानुरूप दिसतात की त्यांना अुपमा या दोन किशोरांच्या मुग्ध प्रणयाचीच. त्यांच्या स्नेहाअितकेंच हें वागर्थमीलन अेकरूप नि अुत्कट आहे.

भव्य अुपमा आणि गरुडाची भरारी घेणारी कल्पनाशक्ति हे विशेषहि मिल्टनच्या काव्याशीं समान असे आहेत. पण ते 'रीती'च्या शीर्षकाखाली येत असल्यामुळे त्यांचा विचार 'वृत्त' चर्चेमध्ये करणें अप्रस्तुत होईल. सावरकरांच्यांत अेक गोष्ट नाही, जी मिल्टनमध्ये प्रामुख्याने दिसते. ती म्हणजे संक्षिप्तरचना (conciseness). त्यामुळे मिल्टनची रचना मरजरी शालूच्या सारखी अर्थघन असते. ही गोष्ट त्याला शब्दांची तोलून, मापून आणि घोटून योजना केल्यामुळे साधली आहे. अुलट सावरकरांची रचना विस्तृत असते, त्यामुळे क्वचित् विस्कळितहि भासते.

'वैनायक' वृत्ताचा सयमक अुपयोगहि सावरकरांनी केलेला आहे. त्यांच्या अप्रकाशित 'कुसुमसंचयां'तील 'महासागर' ही कविता 'प्रतिभा' पाक्षिकाच्या सावरकर-विशेषांकांत प्रसिद्ध झाली आहे. तींत वैनायकी दशपद्या आहेत. पद्यांच्या अन्त्यप्रासांची रचना 'अ, ब, अ, ब, क, ड, क, ड, अि, अि' अशी आहे. या कवितेंतील भावना नि विचारहि शांत-गंभीर असल्यामुळे, यमकसाधनेला अडथळा करीत नाही. वक्तृत्वपूर्ण, ओघवत्या रचनेच्या धावत्या गतीला अर्थात् अितकें गुंतागुंतीचें यमकबंधन अडचणीसारखेंच झालें असतें.

जातां जातां अेका मुळावरच आघात करणाऱ्या मुद्याचा विचार करावयाचा आहे. वैनायकाच्या वाचनपद्धतीविषयी श्री. सावरकर लिहितात. "प्रत्येक ओळीचे शेवटीं किंचिन्मात्र थांवून पूर्णविरामाचे तेथे विराम घेत जावा;" ('गोमांतक,' प्रस्तावना) हें किंचिन्मात्र थांबणें चार मात्रांच्या कालाअितकेंच असलें पाहिजे. या थांबण्यालाच "छन्दोरचना"कर्त्यांनी "विराम" म्हटलें आहे. प्रश्न असा आहे की, हा विराम वा हें "किंचिन्मात्र थांबणें" ज्या वक्तृत्वौघासाठी, ज्या धावत्या दीर्घरचनेसाठी हें वृत्त सावरकरांनी प्रथम वापरलें तो वक्तृत्वौघ वा धावती रचना यांच्या आड येअील किं नाही ? या संबंधांत श्री. माधवराव पटवर्धनांनी (प्रस्तुत लेखकाला पाठविलेल्या पत्रोत्तरांत) असें मत दिलें आहे की :

"अेखाद्या चरणारंभींचें कांही शब्द पूर्वीच्या चरणांतील अन्त्य शब्दाशीं जोडून घ्यावयाचे असल्यास चरणान्तीं केवळ खटका असावा; कांही मात्रांचा विराम (वैनायकांत चार मात्रांचा) असतां कामा नये.... वैनायकांत ही सोय नाही. अन्तींचा विराम न घेतल्यास लय बिघडते आणि तो घेतल्यास जे शब्द अर्थदृष्ट्या जोडूनच अुच्चारायला हवेत त्यांच्यांत खण्ड पडतो. तेव्हा "ब्लँक व्हर्स"मध्ये अेक चरणान्त जसा पुढील चरणांत घुसतो, तसा मराठी रचनेंत घुसतां कामा नये. खटके आवर्तनान्तीं अेक वा दोन वा तीनहि घेतां येतात ही सोय आहे."

(म. सा. प. ११-२-२)

अशा रीतीने प्रत्यक्ष 'वैनायका'चे योजक नि त्या छंदाचे शास्त्रदृष्ट्या नियामक या दोघांचेंहि मत "किंचिन्मात्र थांबावें" म्हणजेच "विराम" घ्यावा असें आहे. सावरकर जेव्हां हें वृत्त वाचतात तेव्हा मात्र "अर्थदृष्ट्या" खरोखर पडणाऱ्या "खण्डांची" फारशी जाणीव होत नाही. श्री. माधवरावांनी दाखविलेली खटक्यांची सोय अर्थात् श्री. सावरकरांनी अुपयोजिली आहेच. याविषयी अेक सुधारणा करणें शक्य आहे किं कसें तें पाहिलें पाहिजे. सध्या वैनायकांत चार मात्रांचा विराम आहे तो घालवून अन्ताच्या दीर्घ अक्षराच्या दोन मात्ना नि या चार मिळून सहा मात्नांचा अेक चवथा भृंग त्या ठिकाणीं जर घालतां आला तर चरणान्तीं 'खटका' मात्र राहील आणि शब्द तोडूनहि वाचतां येतील. गुजरातींत सध्या रूढ असलेल्या "गुल्बंकी" छंदांत अशाच २४ मात्रा आहेत. पण त्याची रचना (–⏑) या 'कॉमॅ' गणांच्या अष्टकाने साधली जाते (–⏑–⏑|–⏑–⏑|–⏑–⏑|–⏑–⏑|) अर्थात् यावृत्ताचें हें (वैनायकांच्या अनेकांतलें) अेकच रूप अनेकाविध करावें लागेल. त्यासाठी त्याचें अेखाद्या 'छंदोरचना-'कर्त्याने वेगळें नियमन आणि अेखाद्या श्री. सावरकरांसारख्या महाकवीने अुपयोग केला तरच तें साधेल. येरा गबाळाचें काम नोहे !

अशा विविध प्रकारच्या 'सावरकरी' विशेषांनी युक्त असें हें वृत्त अन्दमानच्या अंधेरींत संस्कारलें गेलें. त्यांत सुदीर्घ रचना केली गेली आणि अतिशय महत्त्वाची गोष्ट की त्यांत श्रीमान विनायक दामोदर सावरकरांनी आपलें दुर्दमनीय, वंदनीय, तेज:पुंज असें व्यक्तित्व ओतलें आहे. तेव्हा तें वृत्त म्हणजे महाराष्ट्रसाहित्येतिहासांतील अेक संस्मरणीय घटना आहे या विधानांत अतियोक्ति ती काय असणार !

[अेक अनिष्ट टीपः— श्रीयुंत सावरकरांच्या 'वैनायक' वृत्ताची मूलोत्पत्ति, त्याचा संस्कार नि त्याचें नामकरण याविषयी कांही अनिष्ट प्रवाद आहेत. पण जरी ते अनिष्ट असले तरी ते अगदीच अकारण आहेत असें म्हणतां येणार नाही. कारण बहुतेक गोष्टींत या वृत्ताचें गुणग्रहण करणारे श्री. माधवराव पटवर्धन वा श्री. वा. ना. देशपांडे यांच्यासारख्यांनीच या संबंधांत आक्षेप घेतला आहे. छन्द:शास्त्राच्या अैतिहासिक समालोचनाच्या दृष्टीने त्यांचें म्हणणें बव्हंशीं खरें आहे, श्री. पटवर्धन छन्दोरचनेंत लिहितात. "...महाराष्ट्रभाट विनायकराव सावरकर यांनी...तीस (त्या 'धवलचन्द्रिका' पूर्वीच्या 'जलधारा'–जातीस) नवें महत्त्व प्राप्त करून दिलें आहे. तथापि ही जाति नवीन् आणि स्वकृत आहे अशा समजुतीने त्यांनी तिला वैनायक असें जें नांव दिलें आहे तें योग्य नाही. प्रस्तुत लेखकाला लिहिलेल्या पत्रांत त्याच्या जुन्यांत जुन्या अुपयोगासंबंधी ते म्हणतात "...या जातींतील जुन्यांत जुनें पद्य म्हणजे

धन्य दिवस आज साधुसङ्ग लाधला !
सर्वहि शुभयोग पर्वकाळ साधला.

हें गोविन्द वणीकर कवीचें होय (पद्यसंग्रह २, ३०३ पाहा.) सर्व पद्य याच मात्रावर्लीत लिहिलेलें असें देवलांचें म्हणजे 'शापसंभ्रमां'तील 'धवलचान्द्रिकाच काय पूर्ण साचली' हें होय. म्हणून त्यास श्री. पटवर्धनानी 'धवलचन्द्रिका' हें नांव 'जलधारा'च्या जागीं दिलें आहे.

मिल्टनच्या blank verse संबंधी असाच आक्षेप होता नि आहे. पूर्वीच अुद्धरिलेल्या अुताऱ्याची अंतींचीं वाक्यें-विशेषतः an example set, first in English हे शब्द मिल्टनने

अेका विशिष्ट अर्थाने वापरले नि टीकाकारांनी पण यासंबंधीची त्याची originality—नवीनता मान्य केली आहे (वॉल्टर रॅले, 'मिल्टन' प्रकरण ५ पाहा) मिल्टनला निदान असें वृत्त आपणा-पूर्वीच्या श्रेष्ठ नाट्यकारांनी नाटकांत वापरून कामगिरी दाखविली आहे, हें माहीत होतें. पण अन्दमानच्या पूर्ण साधनहीन स्थितींत, केवळ पुराणवस्तुसंशोधन केल्यामुळेच ज्याचें अस्तित्व सावरकर सुटून आल्यावर कळलें असें अेखादें पद्य किंवा नाटकांत अगदीच निराळ्या म्हणजे रागदारीच्या रूपांत पूर्ण रूपांतरलेलें अेखादें पद्य आहे, हें श्री. महाराष्ट्रभाट सावरकरांना माहीत असणें शक्य नव्हतें. तेथे त्यांनी घडवलेलें हें वृत्त या दृष्टीने 'स्वकृत'च नव्हे का! आणि अशा रीतीने स्वतंत्रपणें रचलेल्या 'वृत्ता'स विनायकांशारख्या भराऱ्या मारणारें म्हणून 'वैनायक' असें नांव दिल्यास काय दोष! मीं पूर्वीच स्पष्ट केल्याप्रमाणे हें वृत्त श्री. सावरकरांनी संस्कारिलें आहे, त्यांत आपलें व्यक्तित्व ओंतलें आहे, म्हणून त्यास चॉसरच्या छन्दास जसें Chaucerian stanza किंवा त्यावरच संस्कार करून सुधारलेल्या स्पेन्सर कवीच्या वृत्तास जसें Spenserian Stanza हें नांव, तसेंच या सावरकर-संस्कारित वृत्तास विनायकाचें (सावरकरांचें) तें 'वैनायक' असें श्लेषात्मक नांव मिळालें म्हणून काय प्रत्यवाय! श्री. पटवर्धन ही गोष्ट स्पष्ट करतात नि लिहितात, "...ही जाति सावरकरांनी संस्कारिली म्हणून तिला अितरांनी वैनायक म्हणणें जसें शोभेल तसें सावकरांनी स्वतः म्हणणें शोभणार नाही "(वर उल्लेखिलेलें पत्र). हा शोभण्या न शोभण्याचा प्रश्न व्यक्तीच्या मनावर सोडून लौकिकदृष्टया पाहतां वैनायक नांव हें त्यांनी रूढ केलें म्हणून तरी तसेंच राखावयास पाहिजे. तो त्यांचा अधिकार आहे. अर्थात् श्री. सावरकरांचा नांवासाठीं वाद नाही.

दुसरा आक्षेप श्री. देशपांडे यांचा ('प्रतिभा'; सावरकर व मुक्तछंद पाहा). सावरकरांनी अजून या अैतिहासिक चर्चेच्या संबंधांत "मूग" गिळल्यामुळें ते त्यांना दोषी ठरवीत आहेत. या संबंधांत विचारतां श्री. सावरकर म्हणतात की, पूर्वी जरी ही जाति असली तरी ती सयमक, विशिष्ट रागांत वा चालीत म्हटली जाणारी अशी होती. माझें वृत्त धांवत्या रचनेसाठी आहे, तें निर्यमक आहे, तें राग-चाल-विरहित वाचनीय-पाठ्य आहे. तेव्हां केवळ मात्रांचे साम्य असून जर अितर अधिक महत्त्वाचे हे विशेष त्यांत नवीन आले आहेत तर ती जाति नवीनच: मिल्टनपूर्वीची नाट्यांत अुपयोगिली गेलेली blank verse जशी an example set, *First in English*, तशीच, त्या अर्थीच.

मला श्री. पटवर्धन नि श्री. देशपांडे यांच्याविरुद्ध आक्षेप घ्यावयाचे नाहीत. श्री.माधवरावांनी जातिनामें जुन्यांत जुन्या अुदाहरणांवरून घेतलीं असल्यामुळे त्यांनी 'वैनायक' नांव स्वीकारिलें नाही हें त्यांच्या दृष्टीने योग्यच. तद्वत् श्री. सावरकरांनी आपला पक्ष प्रकटपणे मांडला नाही हेंहि श्री. देशपांडे म्हणतात तसें खरेंच आहे. पण श्री. सावरकरांच्या काव्याचा, तद्वतच श्री. पटवर्धनांच्या "छन्दोरचने"चा अेक नम्र अभ्यासक म्हणून मला योग्य वाटलें तें मीं स्पष्टपणें या अनिष्ट टीपेंत मांडलें आहे.]

# महाराष्ट्र सारस्वतांतील मद्राविभाग

लेखक— चिंतामण गणेश कर्वे



हाराष्ट्राच्या अगदी दक्षिणेस मराठे प्रामुख्याने सोळाव्या शतकापासून वावरूं लागल्याचें आढळत असलें तरी, शहाजी भोंसले बंगळूर प्रांतांत राज्य करीत असल्यापासूनच मराठ्यांची वस्ती म्हैसूर–मद्रासकडे जास्त झाली, यांत शङ्का नाही. मागडीच्या केंपेगौडापासून १६३८ त शहाजीने बंगळूर घेतलें व पुढे पंचवीस वर्षेपर्यंत त्याने आपली ही जहागिरी वाढविली. १६७५ त नायक राजापासून तंजावर घेईपर्यंत व्यंकोजीहि बापामागे बंगळूरासच असे. शिवाजीने कर्नाटकची मोहीम काढल्यामुळे तर मराठ्यांचा अम्मल त्रिचनापल्लीपावेतो दृढमूल झाला. शिवाजीच्या मृत्यूनंतर मराठ्यांचा दक्षिणेकडील जोर कमी होऊन म्हैसूरचा राजा चिक्कदेवराज वडेयर प्रबल झाला व व्यंकोजीचा मुलगा शहाजी याला तीन लाख रुपयांस बंगळूर विकावें लागलें. यानन्तर तञ्जावर प्रान्तातच आपलें स्वराज्य करून मराठे राहूं लागले. आज त्यांचेच वंशज तेथे दिसत आहेत.

व्यंकोजीच्या कारकीर्दीत रामदास स्वामी इकडे आले होते व त्यांनी आपले कांही शिष्य या भागांत ठेऊन दिले. या शिष्यांपैकी भिकाजीबावा शहापूरकर, मौनीबावा व राघवदास यांचें संप्रदाय चांगले वाढून, महाराष्ट्र संस्कृति कायम राखण्याची कामगिरी त्यांनी केली. भिकाजीबावा ऊर्फ भीमस्वामी तञ्जावरला शके १५९९ त आले. त्यांनी इकडे इतकी जागृति करून सोडली की, त्यांच्या मठाच्या तीन शाखा वाढल्या : (१) गोविंदबाळा स्वामी ऊर्फ भाऊस्वामी मठ, (२) झोळीरामबाबा ऊर्फ देव गोस्वामी मठ, आणि (३) आण्णाजीबावा ऊर्फ आत्माराम गोस्वामी मठ. भीमस्वामीच्या मठांत समर्थांची तसबीर जी आढळते ती खुद्द भीमस्वामींनींच काढल्याचें सांगतात. रामचक्र, मारुतीची मूर्ति, झोळी, योगदंड अित्यादि समर्थांच्या वस्तु या मठांत राखून ठेविलेल्या आहेत. भीमस्वामींनी रचिलेलें समर्थांचें चरित्र सुप्रसिद्धच आहे. शके १६६३ च्या सुमारास भीमस्वामी निवर्तले. त्यांची समाधि करूंयत्तंगुडी येथे आहे. यांनी तञ्जावरच्या सहा राजवटी पाहिल्या. प्रतापसिंह राजाने त्यांना राजवाड्यांत आपल्याला अुपदेश देण्यासाठी बोलविलें असतां ते गेले नाहीत, म्हणून रागावून राजाने दुसरा सेतुबावा स्वामी मठ निर्माण केला अशी कथा आहे.

दुसरे समर्थशिष्य मौनीबाबा यांचें नांव फारसें झालें नाही; पण त्यांचे शिष्य अनन्त मौनीस्वामी व त्याहून अनन्तांचे शिष्य जे मेरुस्वामी त्यांचा लौकिक मोठा आहे. मन्नारगुडीला मेरुस्वामी मठ आहे. भीमोपदेश, रामसोहळा, अवधूतगीता, अनंत वाल्मिकि (नाटक), अित्यादि किती तरी ग्रन्थ स्वामींनी रचिले आहेत; व ते इकडेहि प्रसिद्ध आहेत.

तिसरे शिष्य राघवदास हेहि फारसे प्रसिद्ध नसून त्यांचे शिष्यच माधवस्वामी नांवाचे

मोठे होऊन गेले. हे माधवस्वामी मुक्तेश्वराप्रमाणे एकनाथ महाराजांचे नातु आहेत असा शोध लागला आहे. एकनाथ महाराजांची कन्या उमा ही नागनाथ नांवाच्या आत्रेय गोत्री ब्राह्मणाला दिली होती; तिचा दुसरा मुलगा हा माधव. या माधव स्वामींचे बरेंच ग्रन्थकर्तृत्व आहे. योगवासिष्ठ, रामायण (सात सर्ग), भारत, गणेशपुराण अित्यादि त्यांचीं काव्यें आहेत. गीतेवर एक प्राकृत टीकाहि त्यांनी रचिली असून ती अद्याप अप्रसिद्ध आहे.

'ज्याचिया अद्भुत संवाद डोहीं। आटली सर्व शास्त्रांची नवाई। यास्तव गीता सर्व शास्त्रमयी। ठाईं ठाईं श्रेष्ठ बोलती॥ सावडिया भक्तीनें तींचा अर्थ। महाराष्ट्र भाषे परमार्थ। रामकृपेनें कथिला यथार्थ। धणी तो समर्थ न्यून पूर्णाचा॥' असा त्याचा शेवट आहे.

या माधवस्वामींना रामपंडित व कृष्णपंडित असे दोन विद्वान पुत्र होते. रामामृततरंग, मदालसोपाख्यान, हरिवंश, भागवत टीका, श्रुतिगीता अित्यादि रामपंडिताचे ग्रन्थ आहेत. कृष्णपंडिताचा मुलगा वासुदेव पंडित हाहि विद्वान ग्रंथकार होअून गेला. त्याने भागवताच्या नवमस्कंधावर एक टीका रचिली आहे. माधवस्वामींचें सर्व घराणेंच पांडेती होतें. कारण त्यांच्या मुलीचा मुलगा अंबाजी पंडित यानेहि 'भागवत' रचिलें आहे.

यांखेरीज विरूपाक्ष नांवाचा अेक कवि तञ्जावरकडे होअून गेला. भक्तिविलास व पञ्चनादमहात्म्य हे त्याचे ग्रन्थ अुपलब्ध आहेत. रुक्म गङ्गाधर हा दुसरा अेक कवि श्रीनरसिंहपुराण, भारत, हरिवंश, शेषधर्मटीका, कृष्णामृत यांसारख्या ग्रन्थांचा लेखक म्हणून माहीत आहे.

भीमस्वामींचा अेक शिष्य गोविन्दबावास्वामी यांचाहि अेक स्वतन्त्र मठ तञ्जावरला आहे. त्यांचा पुतण्या मुकुन्द म्हणून होता. त्याचाहि अेक मठ करूंथत्तंगुडी येथे आहे. मुकुन्दस्वामींचें आडनांव नरसिंहपूरकर असें आहे. श्रीरामकृपाविलास व देवभक्तानुवाद हे दोन मोठे ग्रन्थ व अनेक कविता मुकुन्दस्वामींनी रचिल्या आहेत.

अिकडल्याप्रमाणेच तञ्जावरकडेहि पोवाडे-लावणीकार होअून गेले आहेत. अुटके गोविन्दाचार्य आणि गङ्गाधरपन्त हीं दोन नांवें त्यांमध्यें घेण्यासारखीं आहेत. वेणा, बहिणा यांप्रमाणेच अम्बूबाअी (पदुकोटयाची), गोजीबाअी डबीर व बनुबाअी क्षीरसागर या कवियित्री तिकडे होअून गेल्या.

रघुनाथ पण्डित, हुसेन अम्बर, आनन्दतनय, गोसावीनन्दन यांचा अुल्लेख या दाक्षिणेंतील कवींतच केला पाहिजे खरा, पण त्यांचीं नांवें सर्वश्रुत आहेत म्हणून येथे माहिती दिली नाही. शहाजींचे वंशज असलेल्या सातारच्या भोसले राजांपेक्षा तञ्जावरचे राजे जास्त विद्वान आणि विद्वानांचे चहाते होते, यांत शङ्का नाही. तञ्जावरच्या बहुतेक राजांनी काव्य आणि कला यांना आश्रय दिलेला आहे. शहाजीच्या पदरच्या कवींचें वर्णन 'राधामाधवविलासचम्पू'त सविस्तर आहेच. व्यंकोजीने तेलगूंत 'द्विपाद' रामायण रचिल्याचें साङ्गतात. त्याची पत्नी दीपाबाअी हीहि वेदान्त–भक्तिपर कवनें करी. मराठीप्रमाणेच तेलगू, तामीळ, मल्याळी या भाषांनाहि मराठी दरबारांत आश्रय मिळे. व्यंकोजीनन्तर त्याचा मुलगा शहाजी गादीवर आला. तो स्वतः अुत्तम संस्कृतज्ञ व ग्रन्थकार होता. 'शब्दरत्नसमन्वय' व 'शृङ्गारमञ्जरी' हीं त्याच्याच नांवावर मोडतात. विक्रम-भोजाप्रमाणे त्याचा दरबार शास्त्रीकवींनी भरला असे. चिदानन्द शङ्कर, नाना जोशी, रङ्गस्वामी, दिगम्बर, त्र्यम्बक ज्योतिर्विद हे मराठी कवी या दरबारचे अुत्कृष्ट वर्णन करतात. सरफोजीनेहि बापाचें नांव चालविलें; पण त्यापेक्षा त्याच्या मागूनचा राजा तुकोजी हा प्रख्यात भाषाभिज्ञ होअून गेला. 'धन्वन्तरि-

विलास' व 'सङ्गीतसारामृत' हे त्याचे ग्रन्थ आहेत. १७४१ त तञ्जावरच्या गादीवर बसलेला प्रतापसिंह हा चांगलाच मराठी ग्रन्थकार होता. 'ऋषिपञ्चमीव्रत', 'ध्रुवचरित्र,' 'प्रबोध चंद्रोदय', 'कृष्णजन्म' अित्यादि ग्रन्थांचा तो कर्ता असून, कावेरी तीरावरील निरूवन्दुर येथे त्याने मराठी विद्यापीठच जणूं स्थापिलें होतें. याची रखा मधुपालनी हीहि तेलगू काव्यें करी. शृङ्गारपूर्ण भावगीतांबद्दल तिची ख्याति आहे. तुळाजी राजाच्या अमदानींत सङ्गीताला बहर आला होता, कीर्तनाला रङ्ग चढला होता, नृत्याला महत्त्व प्राप्त झालें होतें. या राजावर अनेक काव्यें–प्रशस्ती रचण्यांत आलीं आहेत.

तञ्जावरच्या मराठी अम्मलामुळे मद्रास प्रान्तांत लेखनाची लिपि मोडी ठरून गेली. मोडींत लघुलेखन होत असल्याने दरबारीं व न्यायमन्दिरांतून तेलगू, तामिळ अित्यादि मराठीतर भाषांतील कागदपत्रेंसुद्धा मोडी लिपींतच लिहिण्याची प्रथा पडली. शके१६३४तील रामनदच्या राजाचे दानपत्र मोडींत आहे. नुकते १९१० मध्ये मदुरेच्या देवळासम्बधी नोन्दलेले अेक खत मोडींत आहे. मजकूर तामिळ असून लेखक अेक अय्यर आहे ! आता मात्र मोडी मागे पडली. पण ते अगदी स्वाभाविक आहे. आपल्याकडे काय स्थिति आहे त्याचा विचार केल्यास आश्चर्य तें कसलें !

अिङ्ग्रजी अमदानींतहि तिकडे बरेच मराठी लेखक होअून गेले. सुप्रसिद्ध सर टी. माधवराव हे चाङ्गले मराठी कवि होते, हें सर्वश्रुत आहेच. तञ्जावर जवळ तण्डालम् म्हणून अेक लहान गांव आहे. तेथल्या अेका महाराष्ट्रीय घराण्यांत रामचन्द्रराव,कृष्णराव व गोपाळराव असे तीघे बन्धु मराठी लेखक म्हणून पुढे आले. रामचन्द्ररावांचा 'कवितासंग्रह' प्रसिद्ध झाला आहे. कृष्णरावांचीं कांहीं पदे असून गोपाळरावांनी गोल्डस्मिथच्या 'हर्मिट'चें छन्दोबद्ध रूपान्तर केलें. आहे. यांखेरीज राजे मल्हारीराव पुणताम्बेकर, गान्डेकर अित्यादींच्या कविता प्रसिद्ध आहेत. अगदी अलीकडे मराठी ग्रन्थरचना फार कमी दिसते. याचें बहुंशीं कारण तिकडे मराठीचें रक्षण आणि संवर्धन मुळीच होत नसून, पुढारलेल्या महाराष्ट्रीय जनतेचे या गोष्टीकडे लक्ष नाही. आता तर हिन्दीचा अमल जारी आहे. राष्ट्रभाषेपुढे जुनी पुराणी मराठी टिकविणें व वाढ विणें शक्य आणि अिष्टहि वाटत नाही; अशी परिस्थिति आहे.

मद्रासअिलाखा, त्रावणकोर, कोचीन आणि म्हैसूर या भागांत मराठी बोलणारांची वस्ती सुमारे अडीच लाख आहे; तेव्हा अेवढे आपले स्वभाषक असतां मराठीची मृतावस्था आपण निमूटपणे डोळ्यांनी पाहावी यापरता मुरदाडपणा कोणता !

[हा लेख तयार करण्यास मद्रासेतील 'महाराष्ट्र अेज्युकेशन फण्ड' या संस्थेच्या ज्युबिली ग्रन्थाचा अुपयोग केला आहे.]

---

चर्चा

# रोमन किं नागरी ?

## अेकलिपी

कोणत्याहि देशाच्या प्रगतीस अेक लिपी व अेक भाषा असणें ही गोष्ट साह्य करणारी आहे. हिंदुस्थानांत भाषा बहुत असून त्या लिहिण्याच्या पद्धतीहि बहुत आहेत. आजच्या मुंबअी अिलाख्यांतहि गुजराथी, मराठी, कानडी, अुर्दू अशा चार प्रमुख भाषा असून त्यांच्या लिप्याहि स्वतंत्र आहेत. राष्ट्रभाषा म्हणून हिंदीचा प्रसार होत आहे, पण तिची लिपी मराठी लिपी पासून ती फारशी भिन्न नसल्याने या नव्या भाषेमुळे लिपींत वाढ होत नाहीं.

वास्तविक पाहतां अुर्दू व हिंदी या मूळच्या अेकच. परंतु त्या त्या भाषेंतील विद्वानांच्या आरबी, फार्सी व संस्कृत भाषेच्या प्रेमाने त्या भाषांना दिवसेंदिवस भिन्नत्व येत चाललें आहे व त्यामुळे मुसलमानांना अभिजात हिन्दी व हिन्दी बोलणारांना अुर्दू समजत नाहीसें झालें आहे. त्यांच्या लिप्याहि भिन्न आहेत. या भिन्न लिप्या कायम राहणें अपरिहार्य असल्याने राष्ट्रीय सभेने त्या दोन्ही मान्य केल्या आहेत. या कारणाने हिन्दुस्थानांत या देशचीच कोणती तरी अेक लिपी सर्वत्र चालू होण्याची आशा करणें व्यर्थ आहे, असें दिसत आहे.

आजच्या प्रचलित लिपींत नागरी लिपीचा प्रसार जास्त आहे. गुजराथी लोकांची लिपी नागरीजवळच आहे. या लिपींत मुख्य गुण अेका अक्षराचा अेकच अुच्चार व अेका अुच्चाराला अेकच अक्षर हा आहे. कानडी, तेलगू, तामीळ, मल्याळम्, बंगाली, गुरुमुखी वगैरे लिप्याहि याच तत्त्वावर असाव्यात असें वाटतें. अुर्दू मात्र याहून भिन्न आहे. तेथे वाचणाराच्या हातून चुका होण्याचा फार संभव आहे. अी व य, अु आणि व यांचा घोटाळा आहेच. ऱ्हस्व दीर्घ स्वरांचीहि सोय चांगलीशी नाही. नागरीच्या दृष्टीने अुर्दूची अरबी लिपी पुष्कळच कमी दर्जाची आहे. तथापि मुसलमान लोक आपली लिपी सोडून नागरी स्वीकारतील ही आशा करण्यास बिलकूल जागा नाही.

तसेंच दक्षिण हिन्दुस्थानांतील लिप्या टाकून देअून तिकडील लोक सरसहा नागरीचा स्वीकार करतील असें म्हणण्यास तरी काय आधार आहे ? हिन्दी राष्ट्रभाषा होण्याच्या कामीं याच मद्रास अिलाख्यांतील लोकांचा तीव्र विरोध आहे. भाषा कायम ठेवून लिपी बदलण्यास हे मद्रदेशीय कबुली देतील अशी आशा करण्यास फारशी जागा नाही.

कॉंग्रेसच्या मताप्रमाणे दोन लिप्या तर राहणारच. वर जी विचारसरणी मांडली आहे तीवरून जास्तीहि लिप्या राहण्याचा सम्भव आहे.

देवनागरी लिपी लिहिण्या-वाचण्यास कितीहि सोपी असली तरी आजच्या जमान्यांतील सुधारणांच्या दृष्टीने तींतील वैगुण्यें अनुभवास येअू लागलीं आहेत. या लिपींत दोष अगदी नाहीत असेंहि नाही. व्यंजनांना जोडलेल्या ऱ्हस्व 'अि'चा काना अगोदर असण्याचें योग्य कारण दाखवितां येणार नाही. छापखान्याच्या दृष्टीने आजची नागरी लिपी बरीच महागरी आहे.

अनुक्रमणिका

तिच्यांत लिनोटाअीप, मोनोटाअीप वगैरे यंत्रें तयार करणें व चालविणें जास्त खर्चाचें आहे. नागरी टाअीपरायटर केले आहेत, पण त्यांवर काम बरेंच सावकाश होतें. आज काम झटकन् अुरकलें पाहिजे. वेळांत शक्य ती बचत झाली पाहिजे. शिवाय हिंदुस्थानने जगाच्या बरोबर राहिलें पाहिजे, मागे पडतां कामा नये; हीहि गोष्ट विसरून चालणार नाही.

आज हिंदुस्थानांतील सुशिक्षित व अर्धशिक्षित अिङ्ग्रजी भाषा बोलणारे व जाणणारे आहेत, म्हणूनच राष्ट्रीय सभेसारख्या संस्था सुरू करतां आल्या, भरभराटीस आणतां आल्या व चालवितां येत आहेत. आजहि राष्ट्रीय सभेच्या ठरावांचा मसुदा अिङ्ग्रजींतच तयार होत आहे, त्यांवर मोठमोठीं भाषणें अिङ्ग्रजींतच होतात. हिंदी भाषेच्या अभिमान्यांनी आपल्या संस्कृतप्रचुर भाषेंत केलेलें भाषण आमच्या किसानांस मुळीच कळत नाही. अुर्दूचा झगडा आड येत असल्याने दोन राष्ट्रभाषा असण्यापेक्षा बेसिक अिङ्ग्लिशसारखी फक्त ८५० शब्दांची सोपी भाषा सर्वत्र शिकवावी काय असा प्रश्न आमच्या देशापुढे लवकरच अुभा राहील असें भय अुत्पन्न झालें आहे.

रोमन लिपी बहुतेक चारहि खंडांत सुरू झालेली आहे व तिचे फायदे सर्वश्रुत आहेत. अिंग्रजी वर्णमालेंतील केवळ २६ अक्षरांनी आमच्या मराठी भाषेची गरज भागणार नाही; जास्त अक्षरें व खुणा लागतील. पण ही लिपी स्वीकारणें हें अेकलिपी या दृष्टीने हितावह आहे.

नागरी व रोमन यांपैकी कोणती लिपी शास्त्रीयदृष्ट्या सोअीस्कर व स्वाभिमानास पोषक आहे, असले प्रश्न विचारले जातात. शास्त्रीय दृष्टि दोन तीन प्रकारची आहे. आमची वर्णमाला प्रथम स्वर, नंतर व्यंजनें, त्यांचीहि वांटणी कंठ, तालु, मूर्धा, दन्त व ओठ या स्थानांप्रमाणे केलेली खरोखर शास्त्रीय आहे; तशी A, B, C वगैरे रोमन वर्णमाला नाही. पण आता मराठी शाळेंत शिकवण्याच्या सुलभतेसाठी ग, म, भ, न, वगैरे क्रमाने अक्षरें शिकवितात. वर्णमालेच्या बाबतींतला शास्त्रीयपणा व्याकरण शिकतांना मात्र अुपयोगी. अेरवी त्याला फारशी किंमत नाही. आता अुच्चाराप्रमाणे लिहिणें व लिहिण्याप्रमाणे वाचणें हा शास्त्रीयपणा महत्त्वाचा आहे. ही गोष्ट अिंग्लंडांतहि मान्य आहे. तेथे सर्व लघुलिपींत हेंच तत्त्व आचरणांत आहे व फोनेटिक स्कूल अितर बाबतींतहि अुच्चारांप्रमाणे लिहावें व लिहिण्याप्रमाणे वाचावें या मताचा प्रसार करीत आहे. मराठी किंवा दुसरी कोणतीहि भाषा रोमन लिपींत लिहिण्याची किंवा छापण्याची झाल्यास आमची अुच्चाराप्रमाणे लिहिणें ही प्रथा चालू राहीलच. तेव्हा रोमन लिपीचा स्वीकार केल्याने शास्त्रीय दृष्टीहि विघडत नाही व सोयहि नाहीशी होत नाही. आता स्वाभिमानाची सबब पुढे करण्यांतहि विचारीपणा टिकत नाही. सर्व हिंदुस्थानने नागरी लिपी घ्यावी असें सांगतांना कानडी, तेलगू, गुजराथी, बंगाली वगैरे लोकांस आपल्या लिपीचा अभिमान सोडा असेंच फर्मावणें आहे. या योगाने त्यांच्या स्वाभिमानास धक्का बसेलच. आज बेळगांव, धारवाड सारख्या शहरीं मराठी भाषेतलें व्याख्यान अैकण्यास जे लोक तयार नाहीत ते आपली लिपी सोडून मराठी लिपी स्वीकारतील अशी आशा कशी करावी! शिवाय ऱ्हस्व अे व ओ त्या लिपींत आहेत त्यासाठी नागरी लिपींत अक्षरें वाढवावीं लागतील. अुर्दूची तर अडचण आहेच. तेथेहि स्वाभिमान आड येणार आहेच अुर्दू लिपी इतरांनी स्वीकारणें शक्य नाही. नागरी लिपी स्वीकारणें, हें मुसलमानांच्या स्वाभिमानास विघातक. अेक लिपी करणें हें तर राष्ट्रहितास आवश्यक. यासाठी सर्व लिपींच्या लोकांनी आपापल्या लिपीचा अभिमान सोडावा असा अुपदेश केल्यास तो पटण्याचा व अंमलांत येण्याचा जास्त संभव आहे.

लिपीच्या कामीं स्वाभिमानाचा विचार करण्यांत फारसा अर्थ नाही. मुख्य विचार सोयीचा करावयाचा आहे. आगगाडी बैलगाडीपेक्षा जास्त सोयीची आहे असें पाहून आम्ही आगगाडींत बसूं लागलों. मोटारी जास्त सोयीच्या म्हणून त्यांचा अुपयोग जास्त करूं लागलों. अिंग्रजी सूट, बूट, हॅट जास्त सोयीचीं म्हणून तो पोषाख आमचे तरुण जास्त प्रमाणावर स्वीकारीत आहेत. अशा कामीं स्वाभिमान सहज नजरेआड होतो.

तुर्की राष्ट्राला व त्या राष्ट्राचा नेता केमालपाशा याला स्वाभिमान नाही असें कोण म्हणेल ! आरबी लिपी टाकून देअून त्यांनी रोमन लिपी स्वीकारिली आहे. देशाची अुन्नति, देशाचें कल्याण, त्या लिपींत त्या राष्ट्राला दिसलें व त्यांनी पूर्वीची लिपी टाकून देअून रोमन लिपीचा अंगीकार केला. आमच्या राष्ट्रानेहि तसेंच करणें योग्य आहे. महाराष्ट्र साहित्य संमेलनांत या विषयावर खुल्या दिलाने चर्चा झाली पाहिजे. सर्व देशाची अेक लिपी झाली पाहिजे हें ध्येय कायम ठेवल्यास अखेरचा निर्णय रोमन लिपीच्या बाजूचा होणार यांत संशय नाही. या कामीं आपल्या देशाचा सवता सुभा करायची हाव न धरतां देशाच्या अुन्नतेची सिद्धि होण्यावर नजर ठेविली पाहिजे. सर्व अभिमान टाकून देशसेवा या अेका ध्येयावर जोर दिला पाहिजे.

भास्करराव जाधव

---

## रोमन लिपीचा चञ्चुप्रवेश

तुर्कस्थानाने आरबी लिपीचा त्याग करून रोमन लिपीचा स्वीकार केला यांत नवल नाही; कारण आरबी लिपी लेखनाच्या दृष्टीने व विशेषतः मुद्रणाच्या दृष्टीने अत्यन्त गैर-सोयीची आहे. जबर, जेर व पेश या तीन स्वरांवर आपले विविध अुचार भागविणारी ही लिपी अशास्त्रीय आहे. तिची सुधारणा होणें अशक्य वाटल्यामुळे तुर्कस्थानाला रोमन लिपीचा अङ्गिकार करणें भाग आहे. शिवाय तुर्कस्थानाचा कांही भाग युरोपखण्डांत आहे व त्यामुळे युरोपखण्डाशीं तुर्कस्थानचें घनिष्ट नातें आहे. तुर्कस्थानाची राजधानी व खलीपाचें धर्मपीठ म्हणून अगदी परवापर्यन्त प्रसिद्ध असलेलें कान्स्टण्टीनोपल शहर हें तर युरोपखण्डाचें दक्षिण-दिशेचें द्वार म्हणून प्रसिद्ध आहे. युरोपखण्डांत रोमन लिपी सर्वत्र रूढ असल्यामुळे तुर्कस्थानाने तिचा अङ्गिकार करणें स्वाभाविक झालें.

परन्तु हिन्दुस्थान देशाचा युरोपखण्डाशीं शेजारसम्बन्ध नाही. हिदुस्थानांतील बहुसङ्ख्याक समाजाला देवनागरी लिपी परिचित आहे. हिन्दु लोकांची धर्मभाषा संस्कृत व धर्मलिपी देवनागरी आहे. हिन्दुस्थानांत पञ्चवीस कोटींपेक्षा अधिक हिन्दु लोक राहतात. तेव्हा देवनागरी हीच हिन्दुस्थानची राष्ट्रलिपी आहे. शिवाय शास्त्रीय दृष्टीनेहि देवनागरी लिपी आरबी लिपीपेक्षाच काय परन्तु रोमन लिपीपेक्षाहि अधिक सुधारलेली व पुढारलेली आहे. छत्तीस व्यञ्जनें, सोळा स्वर आणि अुच्चाराचे विविध प्रकार दर्शविणारीं जोडाक्षरें, यांच्या योगें ही लिपी शास्त्रशुद्ध बनली आहे. मुद्रणसौकर्याच्या दृष्टीनेहि तिने या घडीला बरीच मोठी मजल मारली आहे. देवनागरीचा त्याग करून रोमन लिपीचा अङ्गिकार करणें, म्हणजे आपल्या गळ्यांतील मौल्यवान सोन्याची सरी फेकून तिच्या जागीं तुर्कस्थानाने नाअिलाजास्तव

गळ्यांत अडकवलेली सुम्भाची दोरी घालून मिरविणें होय. त्यामुळे फायदा तर होणार नाही परन्तु गळ्याला परभाषेचा फास मात्र बसेल व हिन्दु राष्ट्राचा प्राण नष्ट होईल.

कारण रोमन लिपीच्या मागोमाग इंग्रजी भाषा हिंदुस्थानच्या मानगुटीस बसली म्हणून खुशाल समजावें. इंग्रज या देशाचे राज्यकर्ते असल्यामुळे आजच इंग्रजी भाषेचें या देशांत केवढें विलक्षण प्रस्थ माजलें आहे. इंग्रची भाषेच्या जुलमाने देशी भाषांचा कोंडमारा झाला आहे व त्या व्याधिग्रस्त अवस्थेंत आपला काळ कसा तरी कंठीत आहेत. अपमानास्पद स्थितींत त्यांना आपलें जिणें कंठावें लागतें आणि अशा स्थितींत हिंदुस्थान देशाने राष्ट्रलिपी म्हणून रोमन लिपीचा अंगिकार केला तर इंग्रजी भाषेच्या उन्मादाला सीमा राहणार नाही व तिच्या टाचे-खाली देशी भाषा चेंगरून मरतील.

रोमन लिपीचा अंगिकार करावयाचा तर अिंग्रजी भाषेनेच काय घोडें मारलें आहे ! हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतातील सुशिक्षित हिंदुमुसलमानांची ती देवघेवीची भाषा म्हणून आज प्रचलित आहे. बंगाली, मद्रासी, कानडी, पंजाबी, मराठे तिच्या मार्फत आपल्या विचारांची देवघेव करतात व राष्ट्रैक्य साधतात. सर्वसामान्य जनतेंत अिंग्रजीचा प्रसार आज नाही खरा. परंतु सामान्य जनतेंत रोमन लिपीचा प्रचार होणें शक्य व सुलभ असलें तर अिंग्रजी भाषेचा प्रसार होणें तरी कठिण कां वाटावें ! अिंग्रज अधिकाऱ्यांचे बबर्जी, खानसामे, भिस्ती, बेअरर, दर्जी वगैरे नोकरप्यादे मोडकेंतोडकें अिंग्रजी आज देखील शिकविल्याशिवाय केवळ सहवासाने बोलूं शकतात, मग राष्ट्रैक्याकरितां सर्व देशी भाषांना अखेरची तिळांजलि देऊन रोमन लिपीबरोबर अिंग्रजी भाषेचाहि राष्ट्रभाषा म्हणून अंगिकार कां करूं नये ! अिंग्रजी भाषेमुळे हिंदुस्थान देशाचे आंतरराष्ट्रीय संबंध अधिक दृढ होतील. अिंग्रजी भाषेला जगांत आज फ्रेंच व जर्मन भाषांपेक्षा अधिक महत्त्व चढलें आहे. कारण ती केवळ ब्रिटिश साम्राज्याची भाषा नसून जगाचे धनको असणाऱ्या अमेरिकेच्या संयुक्त संस्थानांचीहि राष्ट्रभाषा अिंग्रजीच आहे. तेव्हा रोमन लिपीबरोबर अिंग्रजी भाषेचा अंगिकार करणें हिंदुस्थानच्या हिताचें ठरेल !

आणि हें सर्व करावयाचें कां !—तर हिंदुमुसलमानांचें ऐक्य साधण्यासाठी ! कारण हिंदुस्थानांतील मुसलमान आपल्या अशास्त्रीय आरबी लिपीचा त्याग करून देवनागरीचा स्वीकार करावयास तयार नाहीत ! तुर्कस्थानांतील त्यांच्या भाअीबंदांना आरबी लिपी गैर-सोअीची वाटली. व अुद्या कदाचित् अिराण, अीजिप्ट, अरेबिया व अिराक येथील मुसल-मानहि आरबी लिपीचा अशास्त्रीय म्हणून त्याग करतील ! परंतु हिंदुस्थानांतील मुसलमान–रामाचें, नव्हे अल्लाचें नांव तें ! ते कदापि आपली अुलटी व हेंगाडी लिपी सोडणार नाहीत. ते अिंग्रजांच्या रोमन लिपीचा यदाकदाचित् अंगिकार करण्यास तयार होतील परंतु हिंदूंच्या देवनागरीला दुरून स्पर्श करावयासहि तयार होणार नाहीत. चुकून स्पर्श झालाच तर ते सचैल स्नान करून शुद्ध होतील.

तेव्हा हिंदुमुसलमानांच्या या भविष्यकालीन काल्पनिक अैक्यासाठी देवनागरीचा त्याग करून रोमन लिपी अंगिकारण्याचा प्रश्न अुद्भवलेला दिसतो. कारण हें अैक्य साधल्याशिवाय हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचा प्रश्न सुटणार नाही अशी कांग्रेसची मनोभूमिका आहे व बाबू सुभाष चंद्र बोस हे राष्ट्रसभेचे कर्णधार आहेत. कारण हिंदीला 'याने हिंदुस्थानी' अशी जोड देऊन देवनागरीला आरबी लिपीच्या दाव्यास बांधूनहि मुसलमानांचें समाधान होतां दिसेना व राष्ट्रभाषा आणि राष्ट्रलिपी यांचा प्रश्न सुटण्याचा संभव अुजाडेना. कारण मुसलमानांच्या मतें अुर्दू ही हिंदु-स्थानची राष्ट्रभाषा असून आरबी लिपी ही राष्ट्रलिपी आहे. विकल्प म्हणून रोमन लिपी व

अिंग्रजी भाषा यांचा कोणीं अंगिकार केल्यास त्यांची तेवढी जोराची हरकत नाही. परंतु संस्कृतोद्भव हिंदी भाषा व देवनागरी लिपी यांचें त्यांना अत्यंत वावडें आहे. दक्षिणेंतील द्राविड भाषा व लिपी यांनाहि ते बहिष्कृत लेखतात. तेंव्हा अुर्दूखेरीज सर्व हिंदी भाषा व आरबीशिवाय बाकीच्या हिंदी लिप्या, आरबी समुद्रांत बुडाविल्याशिवाय हिंदी मुसलमानांचें समाधान होणार नाही.

हिंदुमुसलमानांच्या अैक्याशिवाय हिंदी स्वातंत्र्याचा प्रश्न सुटणें शक्य नाही, या कांग्रेसच्या मनोभूमिकेला अनुसरूनच राष्ट्रसभापतींची लिपिविषयक शिफारस आहे. लिपीच्या मागोमाग भाषाविषयक शिफारसहि यथाकाल राष्ट्राच्या समोर मांडली जाईल. मुसलमान आपले पाअूल भक्कम रोवून जागच्या जागीं उभे आहेत. हिंदूंना स्वातंत्र्याची व त्यासाठी हिंदुमुसलमान अैक्याची तीव्र तहान लागली आहे. तेंव्हा याला एकच उपाय आहे. तो हा की,

१. हिंदुस्थानची राष्ट्रलिपी आरबी, राष्ट्रभाषा अुर्दू व राष्ट्रधर्म मुसलमानी धर्म असावा.

हें विष पचविणें हिंदु लोकांना फार जड वाटत असेल तर दुय्यम दर्जाचा खालील अुपाय योजून पहावा—

२. हिंदुस्थानची राष्ट्रलिपी रोमन, राष्ट्रभाषा अिंग्रजी व राष्ट्रधर्म खिस्ती धर्म असावा.

राष्ट्रसभापतींनी सध्या दुय्यम दर्जाच्या मात्रेचा पहिला वळसा अुगाळला आहे. पण पुढच्या पायऱ्या क्रमप्राप्त आहेत. हा दुय्यम दर्जाचा अुपाय कांही हिंदूंना कदाचित् पटेल, पण मुसलमानांना कदापि पटणार नाही. तेंव्हा अखेरीस पहिला मार्गच अनुसरावा लागेल. परन्तु १ नंबरची मात्रा फार जहाल असल्यामुळे प्रारंभीं २ नंबरची सौम्य मात्रा देअून ती पचनीं पडल्यावर १ नंबरची मात्रा अुगाळून देणें इष्ट ठरेल. वरच्या अुपायांनी हिंदी स्वातंत्र्याचा प्रश्न सुटणें सुलभ होअील यांत शंका नाही. कारण अेकभाषी, अेकलिपी व अेकधर्मी लोकांचा संघ भिन्नभाषी व भिन्नधर्मी लोकांच्या संघटनापेक्षा अधिक प्रभावशाली व पराक्रमी होणें स्वाभाविकच आहे.

परन्तु स्वभाषा, स्वधर्म व स्वसंस्कृती यांचा नायनाट होअून स्वराज्य व स्वातंत्र्य मिळणार असले तर तें मला नको. कारण तो आत्मनाश होय. व अेकदा आत्मनाश झाल्यावर स्वराज्य व स्वातंत्र्य या शब्दांना अर्थच अुरत नाही.

रोमन लिपीच्या चंचुप्रवेशानन्तर भाषेवर व धर्मावर संकट कोसळणार हें निश्चित आहे. तेंव्हा या अुंटाच्या पिल्लाला सर्व देशी भाषाभिमान्यांनी विरोध करणें आवश्यक आहे. कारण हें पिलू शेफारलें तर मस्त होअून धुमाकूळ घालेल.

हिन्दी भाषा हीच हिन्दुस्थानची आन्तरप्रान्तीय व्यवहाराची राष्ट्रभाषा होय व देवनागरी लिपी हीच राष्ट्रलिपी होय. प्रत्येक प्रान्तातील सर्व व्यवहार—शिक्षण, राज्यकारभार-प्रान्तीय भाषेंतून चालावा. जागतिक वा आन्तरराष्ट्रीय व्यवहारासाठी अिङ्ग्रजी भाषा व रोमन लिपी हाताळणें व तोण्डाळणें अवश्य आहे. हिन्दी जनतेचें शिक्षण त्यांच्या प्रान्तीय मातृभाषेंतूनच होअील. ज्यांना आन्तरप्रान्तीय व्यवहार करावे लागत असतील असे फारच थोडे लोक हिन्दी शिकतील व त्याहूनहि थोड्या लोकांना अिङ्ग्रजी शिकण्याची गरज भासेल. मातृभाषेशिवाय दुसऱ्या कोणत्याहि भाषेची सार्वत्रिक सक्ती करणें मूर्खपणाचें होय. या देशांत शेकडा

८८ लोकांना मातृभाषेचें देखील वाचन व लेखन येत नाही. त्यांना तें ज्ञान देण्यांतच राष्ट्राची शक्ति खर्च होणें आवश्यक आह. निरक्षरांना साक्षर करणें हेंच राष्ट्राचें आद्य कर्तव्य आहे व मातृभाषेच्या माध्यमाशिवाय तें साध्य होणें शक्य नाही.

सर्व शाळांतून हिन्दीचें किंवा अिङ्ग्रजीचे शिक्षण देणें हा शक्तीचा अपव्यय होय. त्यामुळे विद्यार्थ्यांच्या धारणाशक्तीवर निष्कारण ताण पडेल. ज्यांना मोठेपणीं हिन्दी वा अिङ्ग्रजी भाषांची आन्तरप्रान्तीय व आन्तरराष्ट्रीय व्यवहारासाठी गरज भासेल, ते खुशाल त्या भाषा शिकतील. पण अशा लोकांची सङ्ख्या अल्पच असणार. सामान्य जनतेला प्रान्ताबाहेर व्यवहार करावाच लागत नाही. त्यांना मातृभाषेचें शिक्षण असलें म्हणजे पुरें. नाहीपेक्षा प्रत्येक महाराष्ट्रीय मुलाला मातृभाषा म्हणून मराठी, राष्ट्रभाषा म्हणून हिन्दी, राज्यकर्त्यांची व जागतिक अुपयोगाची म्हणून अिङ्ग्रजी व धर्मभाषा म्हणून संस्कृत अशा चार भाषांच्या अभ्यासाचा बोजा सक्तीने अुचलावा लागेल. आणि चार भाषांच्या सक्तीच्या शिक्षणाची गोणी त्याच्या पाठीवर लादल्यानन्तर त्याच्या मर्यादित धारणाशक्तीला अितिहास भूगोल, गणित, भौतिक शास्त्रें वगैरे महत्त्वाच्या विषयांचा अभ्यास कसा झेपणार? तो खचून जाअील व ठोंब्या निपजेल. तेव्हां मातृभाषेशिवाय अन्य कोणत्याहि भाषेची शिक्षणांत सक्ती असणें राष्ट्रदृष्ट्या अनर्थकारी ठरेल. बहुसङ्ख्याक हिन्दी जनतेला मातृभाषेचें ज्ञान असलें म्हणजे पुरें. कारण मुख्यतः भाषा हें ज्ञान मिळविण्याचें साधन आहे. भाषेला साधन म्हणून महत्त्व आहे, साध्य म्हणून नव्हे.

तेव्हा राष्ट्रभाषा व राष्ट्रलिपी किंवा आंतरराष्ट्रीय भाषा व लिपी हे प्रश्न बहुसंख्य हिंदी जनतेच्या जिव्हाळ्याचे नव्हत. त्यांचे संबंध फारच मर्यादित आहेत. फार तर शेकडा पांच लोकांना हिंदी राष्ट्रभाषेचा व्यवहार करावा लागेल व अिंग्रजी भाषेचा व्यवहार शेकडा अेक-दशांश लोकांना देखील करावा लागणार नाही. आणि अिंग्रजांची राजकर्ते म्हणून यां देशांतून अेकदा अुचलबांगडी झाली म्हणजे ही संख्या आणखीहि घटेल. परन्तु जों-पर्यन्त अिंग्रज या देशांत राज्यकर्ते आहेत तोंपर्यन्त अिंग्रजी भाषेचें महत्त्व कमी होणें कठिणच. तरी पण थोड्या लोकांच्या सोयीसाठी सर्वसाधारण जनतेवर हिन्दी व अिंग्रजी या राष्ट्रभाषा व आंतरराष्ट्रीय भाषा सक्तीच्या म्हणून शिक्षणक्रमांत लादणें अन्यायाचें व आहितकारक ठरेल. केवळ मातृभाषेचें ज्ञान सक्तीचें करावें व तिच्या द्वारां व्यवहारोपयोगी अितर विषयांचा अभ्यास जनतेने करणें अिष्ट होईल. बहुसंख्याक जनतेने बहुभाषी होण्यांत आपल्या मर्यादित शक्तीचा व्यय करणें अिष्ट नाही. हिन्दी व अिंग्रजी भाषा यांचें शिक्षण-क्रमांत वैकल्पिक स्थान राहील. हिन्दी किंवा अिंग्रजी या ज्यांच्या मातृभाषा असतील त्यांची गोष्ट अर्थातच निराळी.

तेव्हा भावी हिंदी स्वराज्यांत मातृभाषांचें महत्त्व वाढेल. कारण शिक्षण, व्यवहार व राज्यकारभार यांचें माध्यम म्हणून तिला मानसन्मान मिळेल. तेव्हा मातृभाषांच्या अुद्धारार्थ सर्वांनी झटणें हें ओघानेच आलें. सुदैवाने देवनागरी हीच मराठीची मान्य लिपी आहे व संस्कृतोद्भव भाषा म्हणून हिन्दी या राष्ट्रभाषेशीं तिचें भगिनीचें नातें आहे. मराठी भाषा-भिमानी विद्वानांच्या दृष्टीने मराठीचा अुत्कर्ष हिन्दी राष्ट्रभाषेच्या वैभवास पोषकच होईल. मात्र मुसलमानांच्या समाधानासाठी म्हणून 'याने हिंदुस्थानी' असे शेपूट जोडून तिला विटा-ळून भ्रष्ट करणारांना मराठीची वाढ रुचणार नाही. देवनागरीच्या गळ्यांत आरबी लिपीचें

ओढणें अडकवून मुसलमानांचे समाधान होईना म्हणून रोमन लिपीची पूजा बांधूं पाहणाऱ्या-ऱ्याहि डोळ्यांत मराठीचें वाढतें वैभव खुपेल; पण त्याला कोण काय करणार !

देवनागरी ही शास्त्रशुद्ध व परिपूर्ण लिपी आहे. ती हल्ली मुद्रणसुकरहि होण्याच्या मार्गात आहे. हिन्दी राष्ट्राच्या परंपरेला व संस्कृतीला ती पोषक आहे. तिची सर रोमन लिपीला कदापि येणार नाही, मग आरबी लिपीची गोष्ट दूरच राहिली.

नारायण केशव बेहेरे

---

## देवनागरी किं रोमनी

ज्या फिनीशिअन लिपीपासून अर्वाचीन रोमन लिपि तयार झाली आहे, तिच्यापासूनच जगांतलि सर्व सुधारलेल्या लिपींचा अुगम आहे, असा अेक कोट्क्रिम कांही पण्डित करीत असले तरी, रोमन लिपि ही देवनागरीसारखी सुप्रगत आणि अत्यन्त कार्यक्षम नाही, हें बहुतेकांस कबूल करावेंच लागेल. आर्यन आणि सेमेटिक या भिन्न संस्कृतीप्रमाणेच ब्राह्मी आणि सेमेटिक लिपिवंश अगदी विसदृश आहेत. हिन्दुस्थानांतील सर्व लिपि (अर्थात् अुर्दु-हिन्दुस्थानी खेरीज करून) ब्राह्मीसम्भूत आहेत. ब्राह्मीपासून पुढे देवनागरी निघाली. हींत स्वर, व्यञ्जनें, ह्स्वदीर्घ, अनुस्वार अित्यादि प्रत्येक अुच्चाराबद्दल स्वतन्त्र चिन्हें आहेत. यामुळे सुमारे ६४ मूलोच्चारासाठी ६४ निराळीं चिन्हें तयार झालीं खरीं, पण त्यायोगें जें लिहिलें तेंच वाचलें जातें; मग वाचणाराला ती भाषा अवगत असो किं नसो. सेमेटिक वंशोद्भूत रोमन लिपींत ही सोय नाही. सेमेटिक लिपींत वर्ण २२ व अुच्चार १८ च ! यापासून हळू हळू प्रगत होत आलेल्या अिङ्ग्रजीचीच गोष्ट घेअूं या. हींत स्वरचिन्हें सहा, पण त्यांचे अुच्चार मात्र तीस ! व्यञ्जनांसम्बन्धींहि हीच बेबन्दशाही. C (सी) चा अुच्चार कधी 'स' होअील तर कधी 'क' होअील ! फारशी अुच्चार तर फारच थोड्या लोकांस शुद्ध अुच्चारतां येतात.

रोमन लिपि ही लिहिण्यास व छापण्यास सुलभ म्हणून सर्व जगाने तीच स्वीकारावी असें प्रतिपादणें म्हणजे, स्वतःची परंपरागत प्रगत संस्कृति सोडून दुसऱ्याची हीन आणि अप्रबुद्ध संस्कृति बळेने अंगिकारा--कारण ती बहुसंख्याक बलशाली पाश्चात्य राष्ट्रांची आहे, असें न्यूनगंडाच्या जाणिवेने सांगण्यासारखें होअील. अुद्या जपान जर जगांत बलिष्ठ ठरला तर त्याचीहि चित्रलिपि अैकजागत्याला योग्य ठरविण्यांत येअील. असो.

तेव्हा अैकजागत्याच्या कल्पनेने हिंदुस्थानसारख्या खंडसदृश मोठ्या राष्ट्राची भाषाशास्त्रीय दृष्टीने अत्यंत पुढारलेली देवनागरी लिपि सोडून रोमनी स्वीकारणें हें केवळ गुलामी वृत्तीचें मनोदर्शन होअील. शेवटीं अेकच सुचवावेंसें वाटतें की, व्यक्तिलेखनलिपि आणि मुद्रणलिपि हीं निरनिराळीं ठेवल्यास हा लिपिसुधारणावाद बराचसा सुटेल. अल्पसंख्याक अुर्दू भाषिकांसाठी देवनागरी सोडणें हें केव्हाहि अिष्ट होणार नाही.

१९।३।३८. चिंतामण गणेश कर्वे

---

अनुक्रमणिका

श्रीयुत सम्पादक, "साहित्य पत्रिका", यांसी सा. न. वि. वि.

राष्ट्रीयसभेच्या अध्यक्षांनी, हिन्दी राष्ट्राने रोमन लिपीचा स्वीकार करावा अशी सूचना केली आहे पण हिन्दुस्थानांतील बहुसङ्ख्य लोक वापरीत असलेल्या नागरी लिपीशीं रोमन लिपीची तुलना केली तर ती नागरी लिपीशीं बरोबरी करूं शकणार नाही असें वाटतें. कारण,

(१) रोमन लिपींत नागरीपेक्षा स्वर आणि व्यंजनांचीं अक्षरें कमी आहेत त्यामुळे अुचारांत गोंधळ अुडतो. अु.—'थाटमाट' शब्द रोमन लिपींत लिहिला तर त्याचा अुच्चार 'दॅटमॅट' हि होण्याचा संभव आहे. 'खरे', 'साने' वगैरे आडनांवें ज्यांना माहीत नसतात ते लोक रोमन लिपींत लिहिलेल्या या आडनांवांचे जे नानाविध अुचार करतात ते अैकण्याची मौज असते.

(२) हा गोंधळ होअुं नये म्हणून नानाविध चिन्हें, अक्षराच्या वर, खाली, बाजूला देण्याची पद्धति आहे. हीं चिन्हें माहीत करून घेणें हें किचकट काम आहे. शिवाय हीं चिन्हेंहि सर्वत्र ठराविक अुच्चाराचीं निदर्शक नसतात. रोमन लिपींत छापलेल्या ३|४ संस्कृत ग्रंथांची तुलना केल्यास या चिन्हांचा किचकटपणा, अनिश्चितपणा व गोंधळ लक्षांत येअील.

(३) 'अ', 'महाप्राण' वगैरे चिन्हें व्यंजनाहून निराळीं लिहावीं लागल्यामुळे वेळ अधिक मोडतो.

(४) नागरी लिपीची रचना रोमन लिपीपेक्षा अधिक शास्त्रीय आहे.

(५) मुद्रणसुलभतेच्या विषयांत नागरीलिपि मुद्रणसुलभ करणें शक्य आहे.

म्हणून शास्त्रीयतेच्या, सोयीच्या आणि स्वाभिमानाच्याहि दृष्टीने हिंदुस्थानानें नागरी लिपीचाच अेकलिपी म्हणून स्वीकार करावा असें मला वाटतें.

नागपूर,
२०|३|३८. } शं. दा. पेंडसे

---

आपलें ता. १३ चें पत्र पोंचलें. रोमन लिपी हा राष्ट्रभाषेचा प्रश्न सोडविण्याचा अुत्तम अुपाय आहे असें माझें व्यक्तिशः मत आहे व श्री. सुभाषचंद्र बोस यांजशीं या बाबतींत माझें अैकमत्य आहे.

१९ कॅनिंग लेन, नवी दिल्ली.
ता. १९-३-३८. } आपला
एस्. सत्यमूर्ति

---

## सुभाषबाबू व रोमन लिपि

राष्ट्राध्यक्ष श्री. सुभाषचंद्र बोस यांचे हरिपुरा कॉंग्रेसमधील अध्यक्षीय भाषण त्यांच्या पूर्वीच्या विचारसरणीशीं परिचित असलेल्या लोकांना अनेक दृष्टींनी नाविन्यपूर्ण असें वाटलें असेल यांत शंकाच नाही. गेल्या कांही वर्षांत परिस्थितीच्या दडपणामुळे असो किंवा वयाची प्रौढता व अनुभव यांमुळे विचारात येणाऱ्या परिपक्वतेमुळे असो, त्यांचीं जुनीं मतें बदलल्याचा

अनुभव हें भाषण वाचीत असतां पुष्कळांना आला असावा. विशेषतः त्यांनी राष्ट्रीय अैक्य साधण्यासाठी व जगांतील प्रगत राष्ट्रांच्या व्यवहाराशीं समरस होतां यावें म्हणून राष्ट्रभाषा व राष्ट्रलिपी यांच्यासंबंधी जें मत प्रकट केलें, तें आमच्या वरील विधानाला पुढारी देणारें आहे. हिन्दी व अुर्दू यांच्या संमिश्रणापासून बनलेल्या व हिन्दी, याने हिन्दी, हिन्दुस्थानी या नांवांनी अलिकडे विख्यात झालेल्या राष्ट्रभाषेचा त्यांनी जो पुरस्कार केला तो सध्या बऱ्या कॉंग्रेस पुढाऱ्यांचीं जीं अेतद्विषयक मतें प्रसिद्ध आहेत त्यांच्याशीं जुळणाराच आहे. पण हिन्दुस्थानची राष्ट्रलिपी म्हणून रोमन लिपीचा स्वीकार करावा अशी जी सूचना त्यांनी पुरस्कारिली, ती अगदीच अभिनव नसली तरी विचित्र खास आहे. आपलें हें मत बनण्याला १९३४ सालीं तुर्कस्थानांत केलेल्या प्रवासाने आपल्या मनावर जो परिणाम झाला तो कारण आहे, असें त्यांनी आपल्या मताच्या परिवर्तनाचें समर्थन केलें आहे. त्याचप्रमाणे या देशांतील ९० टक्के लोक निरक्षर असल्यामुळे रोमन लिपीसारखी सर्वस्वीं अपरिचित व परकीय लिपी शिकणें लोकांना मुळीच कठीण जाणार नाही, असेंहि त्यानी सांगितलें.

परन्तु त्यांनी स्वतःच म्हटल्याप्रमाणे या कल्पनेचा त्यांनी निःपक्षपाती बुद्धीने विचार केला असला तरी शास्त्रीय दृष्टीनें मात्र विचार केला असेल, असें दिसत नाही. तुर्कस्थानने रोमन लिपी स्वीकारिली ही गोष्ट कदाचित् युक्त झाली असेलहि; पण त्याचें कारण रोमन लिपी ही जगातील सर्व लिप्यांहून अधिक शास्त्रशुद्ध आहे हें नसून तुर्कस्थानची मूळची अरबी लिपि बऱ्याच अंशांनी पूर्णतेच्या व मुद्रणसौकर्याच्या दृष्टीने पंगु होती हें आहे. हिन्दुस्थानांत प्रान्तोप्रान्तीं भिन्न लिप्या प्रचलित असल्या तरी या देशांतील फार मोठ्या लोकसंख्येची लिपी नागरी ही असून ती शास्त्रशुद्धतेच्या दृष्टीने तर पूर्णतम आहेच पण त्याशिवाय सध्याच सुरू असलेले तिच्या सुधारणेचे प्रयत्न अधिक जोराने पुढे रेटले तर ती मुद्रणसौकर्यातहि रोमन लिपीला हार जाणार नाही. परन्तु राष्ट्रलिपीच्या प्रश्नाची ही बाजू सुभाषबाबूंना अपरिचित असल्यामुळेच बहुधा रोमन लिपीने तुर्कस्थानावर केलेल्या अुपकाराच्या चकचकाटाने त्यांचे डोळे अेकदम दिपून गेले असावेत! त्यांनी स्वतःच या भाषणांत रोमन लिपीच्या स्वीकारासाठी जीं कारणें दिलीं आहेत त्यांच्याच अनुरोधाने विचार केला तर अिङ्ग्रजी भाषाच राष्ट्रभाषा म्हणून हिन्दुस्थानने स्वीकारणें योग्य ठरेल! पण अुपयुक्ततेच्या विचाराअितकें तरी निदान महत्त्वाचें स्थान आपल्या प्राचीन संस्कृतिविषयक विचारांची वाहन असलेल्या लिपिविषयक भावनेला राष्ट्रोद्धाराच्या कार्यात आहे किं नाही, हाहि विचार करण्याची वेळ आता निश्चित आली आहे.

—महाराष्ट्र, १३।३।३८

# कुडाळी म्हणींची चर्चा

ले.— श्रीपाद महादेव वर्दे, मुंबअी

पात्रिकेच्या ४१ व्या (फेब्रुवारी) अंकांतील कुडाळी म्हणींची चर्चा हा लेख वाचून कोंकणांतील प्रांतभाषाविषयीची अुदासीनता दूर होत असल्याचें पाहून समाधान वाटतें. कै. परुळेकर वकील, रा. सा. वांदेकर, श्री. मतकरी वगैरे लेखकांनी अेका विशिष्ट दृष्टीने का होअीना चालविलेल्या प्रचारकार्यामुळे या कोंकणी प्रांतभाषेला येत असलेलें महत्त्व अभिनंदनीय आहे. तथापि केवळ भाषेच्या विचाराला अेका वादग्रस्त अितिहासखंडाची झळ लागावी हें अिष्ट नाही. श्री. प्रभु यांच्या केवळ भाषाविषयक चर्चेत झालेला अैतिहासिक प्रचाराचा अुपक्रम मला योग्य वाटत नाही; तसेंच त्यांनी दिलेले कित्येक म्हणींचे अर्थ मला संमत नाहीत म्हणून या बाबतींत लिहीत आहें. श्री. प्रभु यांच्या चर्चेत जो वादग्रस्त अितिहासाचा भाग समाविष्ट झाला आहे, त्याचे प्रचारक यशस्वी ठरले तर मला समाधानच वाटेल. परंतु प्रस्तुत लेखांतील ४, ५ व ६ या म्हणींशीं ग्रथित केलेला अैतिहासिक अुल्लेख तेथे अप्रासंगिक आहे. श्री. कृ. पां. कुलकर्णी यांच्या सुंदर पुस्तकांतहि कुडाळी भाषेचा नमुना देतांना घरगुती भाषा म्हणून त्याच अितिहासाचा जो अुतारा दिला आहे तोहि मला तशाच अप्रयोजकपणाचा मासला वाटतो. श्री. प्रभु म्हणतात त्याप्रमाणे 'कुडाळी' हें त्या भाषेचें नांव 'सरकारमान्य' कधी व कसें झालें तें मला माहीत नाही. माझ्या माहितीप्रमाणे ही भाषा त्या प्रांतांतहि सामान्यतः 'मालवणी' या नांवाने ओळखली जाते. सावंतवाडी, वेंगुर्लें व प्रत्यक्ष कुडाळ येथे जी भाषा किंवा बोली प्रचारांत आहे, ती थोडीशी या 'मालवणी' भाषेहून भिन्न आहे. अुदाहरणार्थ 'करतस', 'जातस' या मालवणी वर्तमानकालीन द्वितीयपुरुषी अेकवचनी क्रियापदरूपांच्या अैवजी 'करतय', 'जातय' अशीं रूपें वाडी-वेंगुर्ल्याच्या बोलींत येतात. 'पंचक्रोशीवर' भाषा बदलते याचें राजापूरपासून मंगळूरापर्यंत प्रांतिक बोलींत होणारे फरक हें नमुनेदार अुदाहरण आहे. या सर्व प्रांतापैकी कोणत्या भागांतील बोलीला श्री. प्रभु कुडाळी म्हणतात, तें समजल्यास बरें होअील. 'कुडाळी', हें नांव सरकारमान्य किंवा लोकमान्य होअूं नये अशी माझी बिलकुल अिच्छा नाही. परंतु अद्याप ग्रंथभाषेच्या दर्जास न चढलेल्या प्रांतिक बोली ग्रंथनिविष्ट होतांना त्यांचें नांव आणि रूप निश्चित व्हावयास पाहिजे अितकाच माझा आग्रह आहे. प्रत्यक्ष कुडाळ हा गांव अथवा शहर येथील प्रचलित बोली 'कुडाळी' या नांवाने संबोधिलेल्या बोलीपेक्षा कशी भिन्न आहे तें मीं वर दर्शविलेंच आहे.

आता म्हणीच्या अनुरोधाने आलेला अितिहास पाहूं. म्हण४: 'होते आंबेगरे तंवसर भट बामण बरे' (मराठी—'होते आंबेगरे तोंवर भट बामण बरे) या म्हणींत 'बामण दण्ड' या 'आसुरी' कराचा संबंध कसा येतो ! द्राविड ब्राह्मणांना 'भट' व गौड ब्राह्मणांना 'बामण' हे पर्याय कोकणांत आहेत. आंब्यागऱ्यांचा खुराक चालू असेपर्यंत हे अुच्चवर्णीय लोक दलितांवर खुष असतात, अितकाच या म्हणीचा अर्थ असून बामणदण्डाचा प्रयोग ब्राह्मणांवर होण्याचा संबंध येत नाही. अुलट ब्राह्मणांचें ब्राह्मणेतरांवर होणारें आक्रमण म्हणींत निर्दिष्ट आहे.

म्हण ५ : 'अगा अगा देसाया काष्टी नाय् नेसाया' या म्हणींत सुद्धा ब्राम्हणदण्ड किंवा लक्षाधीश टोपीवाले यांचा संबंध नसून 'वडें घर आणि पोकळ वांसा' हाच अर्थ आहे. या प्रांतांत 'देसाअी' हें नांव कुटुंबाच्या श्रीमंतीचा लौकिक दाखवितें, अितकेंच वैशिष्ट्य आहे. श्रीमंत कुटुंबांतलीं माणसें पूर्वापार दरिद्री होत आलीं असून त्यांच्या नांवाचा दिमाख तेवढा राहतो, या जगाच्या रहाटगाडग्याचा क्रम म्हणींत सांगितला आहे. तेथे ओढून ताणून वादग्रस्त अैतिहासिक अुल्लेख करणें मला गैर वाटतें.

म्हण ६: ही म्हण मुळांत अेकवचनी आहे. (परुळेकरकृत अितिहास पाहा) 'आद्वेचो जोडलो नि पिढयेचो मोडलो, सारखो नाय्' असें तिचें रूप आहे. त्यांत 'आद्वेचो' म्हणजे 'अडेचा' 'आकस्मिक रीत्या' किंवा 'कृत्रिम प्रकारें'; 'अेकाअेकीं भरभराटीस चढलेला माणूस आणि मोडकळीस आलेला घरंदाज गृहस्थ यांची तुलना करणेंच मुळांत गैर' असा त्या म्हणीचा भावार्थ होय. दैववशात् अेकाअेकीं श्रीमंत बनलेल्या अकुलीन माणसापेक्षा खालावलेल्या स्थितींतील कुलीन मनुष्य केव्हांहि श्रेष्ठ समजावा, हा या म्हणींतील अर्थ सर्वसामान्य आहे. त्याशीं श्री. प्रभु यांनी अेका विशिष्ट काळाचा जोडलेला संबंध मला अनाठायी दिसतो.

म्हणींच्या अनुरोधाने असंबद्ध प्रचार करण्याचा श्री. प्रभु यांच्या लेखाचा जो रोख मला दिसला त्याबद्दल वरील विवेचन केलें आहे. अशा प्रयत्नामुळे अस्थानी वाद माजून कोंकणी बोलीला मराठी वाङ्मयांत योग्य महत्त्व मिळावें, हा जो मुख्य अुद्देश त्याची हानि होण्याचा संभव आहे, म्हणूनच मीं हें लिहिलें आहे. त्या प्रचारांतील मूळ तत्त्वास माझा विरोध नाही तथापि तें तत्त्व अद्याप योग्य पुराव्याने प्रस्थापित झालेलें नाही; मुद्देसूद पुराव्यापेक्षा पुनरुक्ति, भावनातिरेक, शब्दावडंबर आणि कल्पनांची ओढाताण यांवर भर दिल्यामुळे अितिहासदृष्ट्या हानि होते, याकडे श्री. प्रभु व त्यांच्या मताच्या अितर व्यक्ति यांचें लक्ष वेधणें मला अिष्ट वाटतें. या माझ्या स्पष्टोक्तीचा विपर्यास होण्याचा संभवहि मी जाणून आहे. या मुद्याबद्दल याहून जास्त विस्तार न करतां श्री. प्रभु यांच्या लेखाच्या पूर्ततेसाठी आणि कित्येक ठिकाणीं असलेला मतभेद व्यक्त करण्यासाठी अितर कित्येक म्हणींची चर्चा पुढें केली आहे.

म्हण १ : या म्हणीच्या स्पष्टीकरणांत 'अवास्तव कौतुक' आणि 'अुपहास' या शब्दांनी श्री. प्रभु यांनी ध्वनित केलेलें त्या म्हणीचें मर्म स्पष्ट झालें पाहिजे. बारा वर्षांच्या वाढलेल्या मुलीने 'करा' (पाण्याचें लहान मडकें) अुचलावा यांत कांहीच विलक्षण नाही. आणि तेवढयासाठी तिच्या आअीने प्रौढी मिरविणें हास्यास्पद होय. तसेंच 'धू' (संस्कृत दुहिता) म्हणजे मुलगी (म्हण ५७ पाहा) या शब्दाला 'वधू' हा श्री. प्रभु यांनी दिलेला मराठी पर्याय बरोबर नाही. 'कन्या'चा संबंध नवरी (वधू) पेक्षा 'करवली'कडे जास्त येतो.

म्हण २ : 'पदरांत घ्यावें' ह्या वाक्प्रचाराचा अर्थ 'पदरांत पाडून घ्यावें, 'शक्य तितक्या लौकर हस्तगत करावें' हा मशहूर आहे. 'उपरण्याच्या पदरांत घ्यावें' या श्री. प्रभूंनी दिलेल्या अर्थांत विनोदाची छटा असली तरी खरा अिष्टार्थ येत नाही.

म्हण ७ : यांत कुडाळ प्रांत आणि नारळीचीं झाडें यांवरील व्याख्यान अनाठायी आहे. जुन्या पद्धतीच्या आंघोळीच्या जागेंत चिखल असतो हा अनुभव सार्वत्रिक आहे.

म्हण ८ : पदरमोड करून किंवा हानि सोसूनहि पोकळ प्रतिष्ठितपणा मिळविण्याचा प्रयत्न करणें याच अर्थाची अेक ग्राम्य म्हण पत्रिकेंत अेकदां येअून गेल्याचें आठवतें.

म्हण ९ : अेखादी वस्तु आवडली म्हणजे ती पुनः मिळेल किं नाही याचा विचार न करतां ती मिळण्यासाठी हट्ट धरणें. मळ्यांतला गोडा मासा अेकदां आवडला की काल तो

ज्या कोंडींतून आणला, त्या कोंडींत पुनः मासे मिळतील किं नाहीं याचा विचार न करतां पुनः तेथेच तसले मासे मिळविण्यासाठी जाण्याचा आग्रह धरणें, ही म्हण लोभमूलक अविचाराची निदर्शक आहे.

म्हण १० : समानार्थक मराठी म्हंण 'कोहाळा देऊन आंवळा घेणें' अशी हानिकारक अदलाबदल. 'डावी' किंवा 'डावली' म्हणजे नारळाच्या करवंटीस भोंकें पाडून त्यांत काठी घालून बनविलेली पळी.

म्हण ११ : याची समानार्थक मराठी म्हण 'अगाडाच्या बगाडा अुतवास (किंवा छपरास) तंगड्या' अशी करतां येअील. "अगाडाच्या बगडा होते तीन गांव । दोन ओसाड अेक वसेचिना ॥ वसेचिना तेथें आले तीन पाहुणे । दोन आंधळे अेका दिसेचिना ॥" वगैरे अेक जुनें पद आहे. त्यांत 'अगाडाच्या बगाडा' म्हणजे 'अकटो विकट' (याचा अपभ्रंश !) तोच 'अगांची पगा' याचा अर्थ

म्हण १३ : या म्हणींतील 'मांजर' हा प्राणी भाग्यसूचक असल्याची कल्पना प्राचीन अजिप्शियन लोकांत होती व युरोपांतहि आढळते. जर्मन व अिङ्ग्रजी कहाण्यांत त्या कल्पनेचे धागेदोरे आहेत.

म्हण १५ : 'संवाकलो' म्हणजे 'संवय लागलेला' हा अर्थ बरोबर नाहीं. 'चट लागलेला,' 'सवकणें' म्हणजे अिच्छित वस्तु अल्पश्रमाने मिळाल्याचा अनुभव आल्याकारणाने ती पुनः पुनः मिळविण्याची चट लागणें

म्हण १९ : 'आंवील' म्हणजे 'माशाचें कालवण' हा विनोदाचार्य अत्रे यांनी दिलेला अर्थ साफ चुकीचा आहे. ज्या 'कुणब्याला लढाअीची माहिती नाही तो घोरपडीचा अुपयोग तोंडीं लावण्यासाठीं करील' हा श्री. प्रभु यांचा शेरा योग्य नाहीं. सिंहगड प्रकरणांत घोरपडीचा लढाअू अुपयोग आहे. तेथेहि घोरपड मागे वळतांच 'तुझीं खांडोळीं करून शिळ्या माकरीशीं खाअीन' अशी तानाजीने धमकी दिली होती. घोरपडीच्या ताज्या मांसाचा अुपयोग खाण्यासाठी होतो व तें मांस रुचकर समजलें जातें. तथापि मेजवानीसारख्या प्रसंगीं पुरीबरोबर किंवा पोळीबरोबर खाण्यासारखें मांस आंबिलीशीं खाणें हा अप्रयोजकपणा होय. तानाजीच्या उद्गारांचाहि रोंख तसाच आहे.

म्हण २६ : रानगोंवऱ्या वेंचताना अेकदा चुकून ससा अेका सुनेच्या हातीं लागला. सासूने तिची तारीफ केली. त्यामुळे चढून जाऊन दुसऱ्या दिवशीं गोंवऱ्या वेंचायला जातांना 'सासूबाअी, ससा वेंचायला जाअूं कीं शेणी वेंचायला जाअूं !' म्हणून सुनेने विचारणें जसें अुपहासास्पद तसेंच अेखाद्या वेळीं चुकून अनपेक्षित काम हातून घडतांच, जणूं काय आपण तशीं कामें रोज करूं अशी मिजास करणें अुपहासास्पद आहे, हा या म्हणीचा अर्थ आहे.

म्हण ३० : बडाय (=बढाअी, मिजास, मोठेपणाचा आव). बायको गमावली तरी पतकरेल पण मोठेपणाचा आव जातां नये.

म्हण ४१ : 'दुष्काळांत'च्या ऐवजी 'डुकळांत' असें कोंकणी रूप हवें.

म्हण ४६ : 'अुपाय' या शब्दाअैवजी 'ओखद' पाहिजे.

म्हण ४८ : 'माप्या' ही तृतिया नव्हे. 'माप्या' म्हणजे मापलेल्या किंवा मापणाऱ्या ! (संबोधन).

म्हण ५० : 'लिनां' च्या अैवजी 'लिवणां' पाहिजे. शिष्टस्वरूप 'लिहिणें व भिकार चिन्हें' असें होअील. 'भिकार' हें चिन्हें (चिन्हां) याचें विशेषण.

म्हण ५२ : ही म्हण खेकड्यासंबंधी नसून सापासंबंधी आहे. धरला तर चावतो, सोडला तर पळतो, अशी मराठी म्हण आहेच.

म्हण ५० : 'खाय गाडो नि सुक्को नाडो' यांत रोगटपणाचा संबंध नाही किंवा निगा (nurture) उद्दिष्ट नाही.

म्हण ५७ : मुलगी झाल्यावर चांगले कपडेलत्ते तिलाच वापरायला द्यावे लागतात व चांगल्या खाद्यांवर मुलाचा हक्क असतो म्हणून 'मुली आधीं ल्यावें व मुला आधीं खावें'.

म्हण ६४ : या म्हणीचे प्रारंभीं 'वोकडाक' हा शब्द पाहिजे. म्हणीचा अर्थ : बक-ऱ्याला दुष्काळ अगर सुकाळ यांची पर्वा नसते; त्याचा चरितार्थ चैनीनें चालायला शेवऱ्याचे झाडाला पालवी असते. कुटुंबाची स्थिति हलाखीची असतां हातीं लागेल त्याचा फायदा घेऊन चैन करणाऱ्या कुटुंबांतील माणसाला ही म्हण लावतात.

म्हण ६५ : कोंकणी नवरा घाटवळापेक्षा कजाग व कडक असून त्याची आर्थिक परिस्थिति कष्टाची असते, या समजावरून ही म्हण आलेली दिसते.

म्हण ६९ : 'साळ्यां' या नांवाऐवजी 'भागलां' हा शब्द सर्वसामान्य आहे.

म्हण ७० : 'वाड'=ऊंसाचा शेंड्याकडचा बेचव तुकडा. ऊंसाच्या मळ्यांत जाऊन बेचव वाड शोधण्याची खटपट करणें हा अप्रयोजकपणा होय. मळ्यांत चांगले गोड ऊंस सहज मिळतात आणि वाडांनाहि तोटा नसतो. पण ऊंसाचा चांगला गोड भाग सोडून शेंड्याकडचा तुकडा मळ्यांत जाऊन शोधावा तसा अेखादा मनुष्य विपुल सुखाच्या परिस्थितींत असतां अेखाद्या क्षुद्र वस्तूची लालसा धरतो. 'हिऱ्यांच्या खाणींत कोळसा शोधणें किंवा दगड शोधणें,' असा पर्याय समजावा.

कोंकणी प्रांतिक बोली मराठींत नुकत्याच शिष्टमान्य होत आहेत. त्यांचा प्रसार व्हावा, त्यांच्याविषयी प्रतिकूल ग्रह पसरूं नये, व बोलींची माहिती बिनचूक व्हावी, अशा अुद्देशाने वरीलप्रमाणे चर्चेंत मी भाग घेत आहें.

---

## साभार स्वीकार

१ अस्पृश्यता, धर्मनिर्णयपद्धति आणि सनातन्यांचे लपण्डाव—
कर्ता व प्रकाशक : ग. रा. पराञ्जपे, १२८ बुधवार पेठ, पुणें २. मूल्य ८ आणे.

२ तात्त्विक मीमांसापद्धति—
लेखक व प्रकाशक : के. ल. दप्तरी, महाल, नागपूर; मूल्य ६ आणे.

३ धर्म : उद्गम आणि विकास—
लेखक : कृष्णाजी पांडुरङ्ग कुलकर्णी; प्रकाशक : दामोदर सावळाराम आणि मण्डळी, ३८० ठाकुरद्वार, मुम्बअी २.

शुद्धलेखनाचे नवे नियम— ले. श्री. गो. पां. पावशे.

सुभाषचन्द्र बोस— ले. श्री. रा. प्र. कानिटकर; मूल्य १२ आणे.

# कुडाळी लोककथा

लेखक— बाळकृष्ण रामचन्द्र प्रभु, बी. अे.

[कोणीं अेका लेखकाने लोककथांना अुपनिषदें म्हटलें आहे. पण आपल्याकडे त्यांची अुपेक्षाच झालेली दिसून येअील. ठराविक सांच्याच्या सत्यकथांच्या या कालांत सुटसुटीत व स्वयंभू अशा सत्यकथांची नागरजनतेंत चलती नाही. पण जानपदांत त्यांच्यावर मनोरंजनाचें काम असतें. जानपदांच्या समजुती, त्यांच्या रीतीभाती यांची छाप लोककथांवर पडलेली असते. प्रादेशिक जीवनाचा तर तो आरसाच म्हटलें तरी चालेल. त्या कथांमध्ये मनोविश्लेषणशास्त्राचे नियम समजावून दिलेले नसतलि; पण त्यांच्या अभ्यासाने सामुदायिक मनाचें मात्र विश्लेषण करतां येअील. तसेंच अपभ्रंश कसे होतात याचा पडताळा पाहण्यासाठी व योग्य वातावरणाच्या कोंदणांत प्रादेशिक शब्दांची कशी योजना केलेली असते तेंहि पाहून शब्दांची चलनी व अस्सल नाणीं मिळविण्याची ती अेक खाणच होय. म्हणून पुढील कुडाळी लोककथा मराठीच्या अभिमान्यांपुढे ठेवल्या आहेत.]

## कथा १ ली

### शाणो भट

अेक होतो भट. तेची अेक होती बायल. त्यांच्या घरांत तीं दोंगांच जणां होतीं. त्यांकां झीलपूत कायच नाय होतां. पण दोघांय जणां म्हातारीं जाल्लीं होतीं. त्यांका पुढे काय पोरग्यां जायत अशी आशा नाय होती.

तो भट मोटो हुषार होतो. त्याणां काय केल्यान् सांगा तुमकां ! अेक दिवस तो रात्रवाक उठलो. आणि भटणीकय अुठवल्यान्. भटणीन विचारल्यन्, "कित्याक अुठवताहास माकां !" भट म्हणांक लागलो, "आज नीज काय केल्या येयना. जरा दिवो तरी लाव." भटीण म्हणांक लागली, "कित्याक होयो दिवो लांवक !" भट म्हणांक लागलो, "अगे अूठ, आतां जरा गजाली करूंया." भटीण म्हणांक लागली, "गजाली करूंक काय आता तरूणपाण आसा ! तरूणपणांत गजाली सोबान दिसतत." भटान् मोटोच आग्रह धरलो. त्यांवा भटीण काय करतसी बापडी ? तीय अूठान् बसली. त्यांवा भटान् गजाली सांगांक सुरवात केली. गजाली कसल्यो करतलीं तीं ! भट म्हणांक लागलो "बघ, आमकां जर झील जालो, तर त्याचां नांव काय ठेवयां !" भटीण म्हणांक लागली, "काय म्हणतास तुम्ही ! तुमकां म्हातारचाल लागलांसा दिसता. आता काय आमकां झील जातलो ? काय तरी काय वगीच बोलतास पाअूणशी वरसां झालीं तुमकां. केसान् कसे पिकलो." भटान् तां संगळां आयकान् घेतल्यान् आणि मोटो हुषार तो. तो म्हणतां कसो, "पण जालोच समाज झील तर नांव काय ठेवया !" तवां भटीण काय म्हणता, "काय तरी काय बोलतास ! झीलच नाय जांवचो मगे नांव कसलां ठेवतले त्याचां !" भट म्हणांक लागलो, "अग, पण झालो तर त्याचां नांव महंमदखान ठेवयां." भटीण काय म्हणता, "वगीच मुसलमानाचां नांव कित्याक तां ! बरो

भटाचो झील, आणि त्याकां मुसलमानाचां गा, नांव कित्याक ! माझ्या तर वाये शिरशिरीच अुबि रवती आंगार मुसल्मानाचां नांव आयकालां काय !" भट म्हणता, "पण तूं त्याकां हाक कसो मारशील !" भटीण म्हणता, "मी नाय हाक मारूचंय. तुम्हीच आवले मारा हाक. तुमचां आपलां न्हयतांच !" भटान् आपलो अेकदम मोठ्यान् हाक मारली. अेकदम "महंमद-खान, महंमदखान" तो असां आपलां आरडान् दिलां त्याणां. म्हातान्याक घॉपान् खंयसून अिलां कोणाक ठावक !

पण गम्मत काय जाली समाजल्यास ! त्या गांवचो फोजदार होतो महंमदखान. त्याणां साद आयकलो. त्याच्या तो कानांतच पडलो. महो तो साद. तो आपलो बोलावतत तसो, आणि दांव्यांलावन अेकाद्रां गोरूं हाडतत तसो तो इलो आणि भटाक इचारूंक लागलो "भटा ! माकां कित्याक बोलावलस !"

भटान् त्या महंमद फोजदाराक बसांक कांबळां दिल्यान्. आणि त्यांका आपली गजाल सांगांक लागलो. "अघा तुंकां बोलावचां कारण समाजलस ! आम्हीं जात हंव उद्या काश्येक. त्यांना कोणाचां काय द्याणां होतां, तां निभांवचां म्हणान मी कागद करवो काय होतो तो काडुन बघलय. माकां असां अुमांगलां; काय तुझां अैक खांडी भात देवंचां असा. त्यांवा म्हटलां आताच्या आता फेडून टाकुं या. फुडलो कोणी नेम सांगलोहा ! काशयेकच जर राम म्हटलयं, तर मग तुझां द्याणां रवलां. आणि तुझां रिण फेडूंच्यासाठी परत जलम घेंवचो लागात." महंमदखान म्हणांक लागलो, "माकां काय बाबा आठावणां नाय भात तुयां देवंचां आसशीतसां. पण तुयां म्हणतसच तर मी माप घेतंय."

इतक्यां झाल्यार फोजदाराचे शिपाय ठेंवरेंवचे खोलयेंत गेले. आणि भाताचो तटो उलगडल्यानी. त्यांवा अेकदम जी रास जाली तेतुर अेक मोटो, काळो भिकुंडसारखो अेक माणूस होतो. चोर होतो तो. त्या भातांत दडान रवललो. भटान् त्या चोराक पाळतावल्यान्. आणि म्हणान त्याणां इतक्यां नाटक केल्यान्. तो भातय कोणाचां देवचां नाय होतां. त्याणां मगे त्या चोराच्या मुडयाकडे बोट दाखवल्यान् आणि म्हटल्यान् "ह्यां तुमचा भात. ह्या आपलां घ्यावा. आणि पावती द्यावा." फोजदारन् त्याकां बेडी घातली; आणि घेवन गेलो चावडेर. इतको तो भट मोटो हुशार होतो !!

[या कथेंत अेका भटजींचें चातुर्य चित्रित केलें आहे. यांत अेक प्रकारचा विनोद साधला असून, तो विनोद भटजींचें चातुर्य व भटीणबाअीची नरमाअी यांवर आधारलेला आहे. गोष्टीच्या शेवटीं विस्मयकारक घटना दाखविलेली आहे. गोष्ट सांगतांना विस्मयनिर्मि-तीच्या धोरणाने सांगतातच असें नाही. पण हें धोरण ही गोष्ट लिहून काढतांना ठेवलें आहे. पुनर्जन्मावरचा विश्वास, काशीविषयी पवित्र आदर, मुसलमानाविषयी भीति ह्याहि गोष्टी सामुदायिक मनाच्या दृष्टीने महत्त्वाच्या आहेत. गजाली=गोष्टी. त्यांया=त्यावेळीं. वगीच=अुगीच. जांवचो=व्हावयाचा. आंङ्गार=आंगावर. न्हयतांच=नव्हे तें. घॉपान्=शक्ति. अेकाद्रां=अेखादें. इलो=आला. जातहव=जातो आहों. निभोवचा=देअून टाकावें. खाण्डी=खण्डी. ठेवरेवचे=सांठा करण्याची. पाळतावत्र्यान्=पाहून ठेवला होता. ]

## कथा २ री

### जांवयांचां पुराण

अेकदा अेक जांवय सासुरवाडिक गेलो. त्याच्याबरोबर होतो अेक तेचो दोसदार. सासेक

जांवयाची मोठी अपुर्वाय. तिणां जांवयांक सांगलां पुराण वाचुंक आणि जांवय पुराण वाचतलो म्हणान शेजारणी पाजारणी दिलेन् आमंत्राण. सगळयो शेजारणी जमल्यो ते दिवस. ज्यांवा जॅवणां आटापलीं त्यांवा जांवय बसलो पोथी सोडून आणि तेचो दोसदार बसलो भायर,— असो आपलो वसरेक. पुरुषय सगळे इल्ले आयकांकतेय बसलले भायल्या आंगाक. जांवयान् फडको सोडल्यान् आणि "श्रीगणेशायनमः" असां म्हटल्यान्. हकडो तो दोसदार "वाघरे वाघरे" म्हण मोठ्यान् आरडांक लागलो. त्यँवा सगळे भागपुरुस गेले भायलेभायरं अुठान् आणि वायलमाणसां गेलीं भियान. जांवयान आपलां दप्तार गुंडाळल्यान् आणि खुस्येक लावन् ठेवल्यान्. वाघ हो खंय होतो! वाघ नाय आणि काय नाय. दोसदाराचां सगळां नाटक. दुसरे दिवस जांवय आणि घेडो खतत कित्याक! तेणीं धरल्यानीं घराची वाट.

[जांवअी अशिक्षित असूनहि त्याचे मित्र त्याचा बोज कसा राखतात हें या गोष्टींत दाखविलें आहे. गोष्ट आटोपशीर आहे, पण सासूबाअीचा प्रेमळपणा व्यक्त केला आहे. पुराण सांगणें व त्याचें कौतुक करणें यावरून धार्मिकता जानपदमनावर किती पकड घेअून बसलेली असते तें दिसून येअील. या गोष्टीमध्ये खोटें बोलण्याचा अुपयोग केला आहे. पण ही गोष्ट लोक नीतिमत्तेसाठी अैकत नसून, मनोरंजनाकरितां अैकतात. लौकिक वाङ्मय व वर्तणुकीचे नियम यांचा संबंधहि यावरून अुघड होअील. दोसदार = मित्र, दोस्त. वाचतलो = वाचणार. भायर = बाहेर. वसरेक = घराच्या बाजूला. इल्ले = आले होते. भागपुरुस = भाग्यपुरुष. घेडो = जांवयांबरोबर सासुरवाडीला जाणारा मित्र. धरल्यानी = धरली.]

## कथा ३ री

### बुडालो रे बुडालो!

अेकाचो अेक होतो झील. तो काय तरी अपशब्द बोला. खंयच्या वेळाक काय बोलात् हेचो नेम नाय! पुढे त्याच्या घराक लगीन जांवचां अिलां. त्यांच्या दारांत मांडव घातल्यानी. सगळी तयारी केली. लग्नाचो दिवसय अिलो. लग्नाच्या दिवस त्या झिलाक वरतो माळयेर बसवल्यानीं आणि त्याकां सोजी आणि वडे दिल्यानीं खांवक. कित्या तर बोलात काय तरी अपेशी. आणि लगीन घटका भरत अिली, तो आपलो हकडे खाताहा! अगदी सावधान म्हणाच्या याळाक आणि माळ पडांक पडांक हो आपलो अेकदम आरडलो "बुडालो रे बुडालो". बरां कार्य लोक करतात आणि हो असा आरडला. वर जावन जर बघतत तर त्येचो अेक वडो सोजयेंत बुडालो. असतो तो असशीं पोर बोलां नये त्या याळाक आराडलो!

[या गोष्टींत अुपदेशाची मात्रा दिलेली आहे व ही गोष्ट अुपदेशासाठी सांगण्यांत येते. गोष्ट सांगतांना विनोद अुत्पन्न करते; पण सांगणाराचा हेतु गांभीर्य हा असतो. ह्या गोष्टीची सर्व घडण औचित्यभंगावर केंद्रित झाली आहे. मुलाचा मूर्खपणा अेवढाच गोष्टीचा विषय. गुन्तागुन्त नसली तरी प्रसंग गमतीचा व जानपद मनाला गमतीचा आहे खास. शकुनावर लोकांचा विश्वास असतो. व शुभप्रसंगीं अपशब्दही अपशकुनाप्रमाणे मारक अनुभव देणारा असतो, अशी समजूतहि आधाराला आहे. खंयच्या=कुठल्या. अिलो=आला. सोजी=खिरीसारखा अेक पदार्थ. याळाक—वेळेला.]

---

# साहित्यिकांचे विचार



## भाषाशुद्धीकरण—

स्वत्वाची भावना प्रबल करणें हें शुद्धीकरणाचें साध्य आहे. ही भावना सांगते की, मराठी भिन्न शब्द आपण योजूंच नये, परंतु व्यवहारदृष्ट्या हें सर्वथा शक्य नाही. भौतिक व मानसिक शास्त्रांतील सुधारणांच्या प्रगतीबरोबर सांप्रत कोणताहि देश सोवळा किंवा अेकलकोंडा राहणें शक्य नाही. परदेशस्थांशीं व्यवहार करणें त्यास अपरिहार्य आहे. सर्व देशांतील लोकांनी परस्परांच्या देशांत अूनाधिक प्रमाणांत प्रवेश करणें हें घडणारच व यामुळे विचार, सुधारणा, संस्था, भाषा, यांची देवाण घेवाण पृथ्वीवर सर्वत्र चालूच राहणार. अशा स्थितींत अन्य भाषांतील शब्दांस बंदी करणें आपणांस शक्य नाही. हीच गोष्ट पूर्वकालींहि घडलेली आहे. यवनांच्या सत्तेबरोबर अनेक शब्द आपल्या भाषेंत घुसले. यांतील (१) कांहीं शब्द नवीन कल्पनांबरोबर आले, तर (२) कांही अेरवीच येअून विद्यमान शब्दांना हुसकून देअूं लागले. पैकी (१) पूर्वोक्त शब्द घेणें सोअीवार होतें, पण (२) अुत्तरोक्त शब्द आपणांत असलेल्या कल्पनांचाच बोध करणारे असे शब्द, यांस मात्र प्रतिबंध करणें जरूर होतें. अेकदोन अुदाहरणें घेअूं. संतति, अपत्य, पुत्र इत्यादि शब्द मराठींत असतां अवलाद हा यावनी शब्द आपल्या भाषेंत घुसला याला अेकदम घालवून देणें हें अिष्ट होतें असें प्रथमदर्शनीं वाटतें. पण तसें भाषेने केलें नाहीं. मात्र याच वेळी भाषेने अशी दक्षता घेतली की, या आगंतुकाला ठेवून घरच्यांचेंहि हित साधून घेतलें. तें कसें ! अेकच कल्पना प्रसंगानुसार भिन्न भिन्न शब्दांनी व्यक्त करावी लागते. व्यवहारांत असे प्रसंग अनेक उद्भवतात. त्या त्या प्रसंगानुसार निराळा शब्द असल्यास वक्त्याच्या मनांतील कल्पना नेमकी व्यक्त करतां येते. याच कारणामुळे अिंग्रजींत पर्यायशब्दांची संपत्ति ही बहुमूल्य गणिली जाते. प्रस्तुत प्रसंगीं मराठीने विचार केला की, अपत्य ही कल्पना व्यक्त करण्यास पवित्रप्रसंगीं पुत्र, आत्मज अित्यादि शब्द आहेत; लडिवाळपणाच्या प्रसंगीं लेकरूं शब्द अुपयुक्त आहे. क्रोधदर्शक विधानांत पोर शब्द योजावा; तुच्छतादर्शक विधानांत पोरटा योजावा, पण अेवढ्याने प्रसंग संपत नाहीत. मुलासंबंधी अधर्म्यता व निंद्यता व्यक्त करणें असतां वरील आपले शब्द योजून ते भ्रष्ट कां करा ! अशा ठिकाणीं यावनी शब्द अवलाद हा वळी दिल्यास बरें. या दृष्टीने अधर्म्य-संबंध सुचविणें असतां हा स्वतंत्र शब्द योजावा, असें मराठी भाषेने ठरविलें. याने काय साधलें ! आपल्या शब्दांचा पवित्रपणा व परक्या शब्दांचा भ्रष्ट क्षेत्रांत उपयोग याने आपले शब्द शुद्ध राहिले; व परक्या शब्दांनाहि काम मिळालें. येथे सर्वसंग्राहक बुद्धि उपयुक्तच ठरली आहे. सारांश जवळ असलेल्या वस्तूंचा त्याग सहसा न करतां तिला योग्य असें कार्यक्षेत्र शोधून काढणें योग्य दिसतें.

**गो. कृ. मोडक, ज्ञानप्रकाश, १२।४।३७**

अनुक्रमणिका

## आगामी कविता —

साधारणपणें आधुनिक कवींमध्ये गेल्या साठ वर्षांत अेक जी परंपरा सुरू होती तिला नवीन पिढीकडून कितपत आश्रय मिळेल याची शंका वाटूं लागली आहे. कारण अगदी नवीन पिढींत काव्याचा अगदी तन्मयतेने व्यासंग करणारे फार थोडे आहेत; व जे आहेत त्यांची दृष्टि थोडी फार कविता लिहिली नाही तोंच गद्य वाङ्मयाकडे वळते. त्यांनी गद्य लिहूं नये असें माझें म्हणणें नाही. पण पद्याचीहि त्यांनी तितक्याच कसोशीने जोपासना करावी असें मला वाटतें. पण तसें होत नाही असें दिसतें. मराठींत नवीन नवीन गद्यप्रकार अुदयाला येत आहेत व तरुण कवींना त्यांचें आकर्षण वाटल्यास त्यांत नवल नाही. अशा स्थितींत पद्याची जोपासना माधव जूलियन, यशवंत, अनिल, तांबे यांच्यासारख्या अव्वल दर्जाच्या कवींकडूनच झाली तर होअील असें वाटतें. कारण हे कवि आपल्या वयाच्या व व्यासंगाच्या दृष्टीने परिपक्व दशेला आलेले आहेत; व त्यांच्या प्रतिभेला अजून नवे नवे अुन्मेष फुटत आहेत. तांबे जरी थकले असले तरी त्यांची वाणी अस्सल भावगीतें गात आहे; माधव-जूलियनचें 'तुटलेले दुवे' हें अेकशेअेक सुनीतांचें नवीन खंडकाव्य प्रसिद्धीच्या मार्गावर वाट चालतें आहे. यशवंतांच्या प्रतिभेने दुःखाच्या प्रांतांतून सुखाच्या प्रांतांत पदार्पण केलें असलें तरी तेथील संसाराचीं सुख-स्वप्नें ती तल्लीनतेने रेखाटीत आहे. अनिलांसारख्यांना 'भग्नमूर्ती'सारखे भव्य विषय दिसूं लाग. ल्याने त्यांची स्फूर्ति तिच्यांतील सौंदर्य कुंचलीने रंगवीत बसली आहे. श्री. ना. घ. देशपांडे ललितशृंगाराचीं गाणीं लिहित आहेत, तर तिकडे सोलापूरच्या कडक वातावरणांत कवि कुंज-विहारी आपले स्फूर्तिप्रद पोवाडे गात आहेत. यांखेरीज कितीतरी अज्ञात लोक आपापल्यापरीने सरस्वतीची सेवा करीत असतील. अशा स्थितींत काव्याची जोपासना यांच्याच हातून होअील व पुढे येणाऱ्या महाकवींचा मार्ग हेच कवि उजळतील असें मीं म्हटलें तर त्यांत अतिशयोक्ति वाटण्याचें कारण नाही. आज आपल्याभोवती अनेक तऱ्हेचा अितिहास प्रत्यक्ष घडत आहे. जीवनाचें रूप क्षणोक्षणीं पालटतें आहे. स्थैर्य कशालाच नाही. कालान्तराने तें येअील, पण तें येण्यास आपल्या जीवनांत फार मोठी क्रांति झाली पाहिजे. अशा क्रांतीचीं स्वप्नें आजच्या कवींस पडत नसतील असें नाही, पण तीं बोलण्याची वेळ आली पाहिजे. ती येअील आणि त्या वेळीं प्रतिभाशाली कवि बोलतीलहि. त्या वेळीं त्यांच्या वाणीचें स्वरूप अत्यंत तेजस्वी असें असेल. मराठी भाषेचा जिकडे तिकडे जयजयकार झाल्याने, तिचें पारतंत्र्य पार नाहीसें झाल्याने, ती स्वातंत्र्याच्या वातावरणांत स्वैरपणाने विहार करील. ज्यांनी देशाचा अितिहास घडविला व ज्यांनी त्याच्यासाठी आत्मयज्ञ केले त्यांचीं तीं स्तुतिस्तोत्रें गाअील व आपलें अंतःकरण याही-पेक्षा अुत्कटतेने प्रकट करील.

श. के. कानेटकर (गिरीश), हिस्लॉप कॉलेज, शारदा मंडळ, अध्यक्षीय भाषण

## सावरकर वाङ्मयाचे विशेष—

सावरकरांच्या वाङ्मयाचा मुख्य गुणविशेष तेजस्विता हा होय. व या दृष्टीने मराठी वाङ्मयांत लोकमान्य टिळक, 'काळ'कर्ते परांजपे व कै. अच्युतराव कोल्हटकर हीं नांवें उल्लेख-नीय आहेत. त्यांपैकी अच्युतरावांचें वाङ्मय बरेंच कृत्रिम वाटतें. पाल्हाळिकपणा त्यांत फार आणि म्हणून तेजस्वी वाङ्मयाचे जनक या दृष्टीने सावरकरांची तुलना फक्त कै. शिवरामपंत परांजपे व कै. लोकमान्य टिळक यांच्याशींच होअूं शकेल. वाङ्मयांत सूचक अथवा ध्वन्यात्मक

वाङ्मयाची योग्यता साहित्यशास्त्रज्ञ विशेष मानतात. या दृष्टीने कै. परांजपे यांच्या तोडीचा वाङ्मयनिर्माता दुसरा झाला नाही. वक्रोक्ति हा वाङ्मयप्रकार त्यांनी प्रकर्षाला नेला. पण सावरकर व परांजपे यांच्यांत फार अंतर आहे. दोघेहि तेजस्वी वाङ्मयाचे जनक खरे; पण परांजपे यांचें वाङ्मय प्रायः ध्वन्यात्मकच आहे. सावरकरांच्या लिखाणांत ध्वनीचा अभाव आहे असें म्हटलें तरी चालेल. या गोष्टीची आपणाला स्पष्ट कल्पना यावी म्हणून मी आपल्यासमोर दोन चित्रें उभीं करतों. आपण अशी कल्पना करा की, कै. परांजपे यांना तुम्हांला "धर्मावर आक्रमण करणाऱ्या लोकांना नाहीसे करा" असें म्हणावयाचें असलें तर ते असें सरळ रीतीने कधीच म्हणणार नाहीत. ते तुमच्यासमोर पराक्रमी पूर्वजांचें चित्र अशा रीतीने रेखाटतील की ज्यामुळे त्यांचा उद्देश तुमच्या ध्यानांत यावा. पण याच्या उलट सावरकरांना जर हीच गोष्ट सांगावयाची असेल तर ते या सूचकतेच्या भानगडींत न पडतां सरळ हातांत किरपाण घेऊन 'शत्रूंचीं शकलें करा' असें सांगून मोकळे होतील; व या दृष्टीने सावरकरांची लेखनपरंपरा ही, कै. परांजपे हे त्यांचे राजकीय गुरु असले तरी, त्यांच्या जातीची नसून कै. लोकमान्य टिळकांच्या जातीची आहे. कै. परांजपे यांच्यापेक्षाहि सावरकरांचें वाङ्मय अधिक तेजस्वी असण्याचें कारण त्यांच्या युद्धोन्मुख मनस्थितीबरोबरच त्यांच्या वाङ्मयांतील ध्वन्यात्मकतेचा अभाव हें आहे. या गुरुशिष्यांच्या लिखाणांत इतकें अंतर असण्याचें कारण त्यांच्या मनोरचनेंतील अंतर हेंच आहे. कै. परांजपे यांच्या अंतःकरणांत जे देशप्रीतीचे विचार येत ते त्यांच्या आचरणांत तितक्या प्रमाणांत उतरूं शकले नाहीत. पण त्यांच्या या शिष्यश्रेष्ठाने ते प्रत्यक्ष कृतींत आणून स्वतःची ध्येयात्मकता जगाच्या निदर्शनास आणून दिली.

त्यांच्या गद्य लिखाणाच्या एकाच कक्षेचा आता उल्लेख करावयाचा राहिला. तो म्हणजे त्यांच्या नवमतवादासंबंधीचा होय. त्यांचा नवमतवाद हा सध्याच्या लैंगिक नवमतवादापासून किती तरी भिन्न प्रकारचा आहे व तो सर्वस्वीं विज्ञानाच्या पायावर उभारलेला असल्यामुळे सुज्ञांनाहि विचारणीयच आहे. त्यांचा नवमतवाद केव्हा केव्हा न पटण्यासारखा असला तरी तो सर्वस्वीं बुद्धिवादाच्या पायावरच उभारलेला आहे, व त्यामुळे या बाबतींत सनातनी पंडितांना प्रतिपक्षी या नात्याने ते आदरणीयच वाटतील. त्यांच्या गद्य वाङ्मयाचा उल्लेखनीय विशेष म्हटला म्हणजे हल्ली सर्वत्र आढळणाऱ्या कामुकतेचा सर्वस्वीं अभाव हा होय. स्वदेश व स्वसंस्कृति यांच्या अभिमानाने प्रेरित होऊन लोकांना स्वातंत्र्योन्मुख करूं इच्छिणारे ते क्रियावान तेजस्वी वाङ्मयमहर्षि आहेत. त्यांचें पद्यात्मक लिखाण जितकें प्रसिद्ध आहे त्यापेक्षा नष्ट झालेल्यांची संख्याच अधिक भरेल. अभिजात कवि त्यालाच म्हणतां येईल की ज्याची कल्पनाशक्ति भव्य व विशाल असते. या कवींत महाराष्ट्रांत बॅ. सावरकरांचेंच नांव अग्रस्थानीं शोभेल. आपल्या 'सप्तर्षि' या कवितेंत त्यांनी 'व्योमकेश' या शब्दावर अशी एक कल्पना केलेली आढळते की, विश्व हाच महादेव, व्योम म्हणजे आकाश हे त्याचे केस होत. चंद्र त्याच्या भालप्रदेशीं असून आकाशगंगा त्याच्या मस्तकांतून वाहते. काय ही भव्य व उदात्त कल्पनाशक्ति ! या दृष्टीने 'महाकाव्य न लिहिलेले महाकवि' असा एका मान्य लेखकाने त्यांचा केलेला उल्लेख अत्यंत उचित आहे. भव्य कल्पनाशक्ति हेंच कवीच्या महत्तेचें मापक होय. त्यांच्या काव्यांत एकच न्यून दाखवितां येईल; व तें म्हणजे शब्दालंकारांचा विलास त्यांत फारसा दृष्टीस पडावयाचा नाही. पण त्यांची कल्पनाशक्ति व तिचा विलास इतका हृदयंगम व त्यांचें भावनाविष्करण इतकें हृदयस्पर्शी व परिणामकारक असतें की, ही उणीव सहस भासत नाही. या दृष्टीने त्यांचें 'कमला' काव्य फारच उत्कृष्ट आहे. मला आवडलेलीं त्यांचीं

काव्यें म्हणजे कमला, सप्तर्षि, सिंहगडचा पोवाडा, वहिनींना पाठविलेलें पत्र व 'सागरा प्राण तळमळला' ही कविता, हीं होत. वडील बंधु अंदमानाच्या वाटेवर निघाले व धाकट्याचीहि तीच स्थिति होणार हें दिसत आहे. स्वतःच्या डोक्यावरहि देहदंडाची तरवार लटकत आहे. अशा स्थितींत त्यांनी वहिनींच्या केलेल्या सांत्वनांत व मृत्युपत्रांत त्यांची जी प्रखर स्वातंत्र्यनिष्ठा व स्थितप्रज्ञता प्रकट झाली आहे तिला तोड नाही.

बॅ. सावरकर हे ध्येयनिष्ठ वाङ्मयोपासक आहेत. वाङ्मयाकरिता वाङ्मय लिहिणें निराळें व विशिष्ट ध्येयाने प्रेरित होऊन वाङ्मय हें त्याचें साधन मानणें वेगळें. श्री. तात्यासाहेब सावरकर हे दुसऱ्या वर्गाचे अग्रणी आहेत. हिंदु संस्कृतीचें संरक्षण व संवर्धन आणि तत्पूर्वक स्वातंत्र्यसंपादन हें त्यांचें ऊर्जस्वल ध्येय आहे.

"हे काय बंधु असतों जरि सात आम्ही। त्वत्स्थंडिलींच दिधले असते बळी मीं ॥"

अशी त्यांची या बाबतींतली खडी वीरवृत्ति आहे. याकरिता जें त्यांनी लिहिलें तेंच त्यांचें वाङ्मय होय.

वा. व्यं. हरदास, महाराष्ट्र १२-१२-३७

## सावरकरांचें लिखाण—

बॅ. विनायकराव सावरकर यांनी गेल्या तीस वर्षांत निर्माण केलेल्या विविध वाङ्मयाचें जर समालोचन केलें तर ओज, कल्पकता आणि ध्येयदर्शित्व हे तीन गुण त्यांत उत्कटतेने प्रतीत होतात. त्यांची मनोवृत्ति युयुत्सु असून देशाभिमान हा त्यांच्या वाङ्मयाचा स्थायिभाव आहे; व त्याच्या आश्रयाने त्यांच्या या गुणविशेषांचा उत्कर्ष झालेला दृष्टीस पडतो. त्यांच्या मनाची युयुत्सुता इतकी विलक्षण आहे की शृंगाररसांत पोहतांना सुद्धा तें फारसें मृदु होऊं शकत नाहीं. 'कमला' आणि 'विरहोच्छ्वास' या त्यांच्या काव्यांत शृंगाराचे संभोग आणि विप्रलंभ हे दोन्ही प्रकार सामान्यतः आलेले आहेत. पण त्यांच्या परिपोषांत सावरकरांची कल्पकता जरी सुंदर रीतीने प्रकट झालेली असली तरी त्यांत कोमलता मात्र एकंदरींत कमीच आढळते. 'कमला' काव्यांत मुकुंद कमला यांच्या प्रथमसंगमाचें जें वर्णन तपशीलवार केलेलें आहे तें वाचतांना असें वाटतें की, कालिदासाची सद्योपभोगाची कल्पना उपमा देण्याच्या बाबतींत त्याच्याशीं स्पर्धा करणाऱ्या या कवीला संमत नसावी. त्यांचा करुणरस हा पुष्कळदा भयानकांत व रौद्ररस पुष्कळदा बीभत्सांत जो पर्यवसित होतो तो तरी याच कारणामुळे.

ज्या कवीची मनोवृत्ति इतकी युयुत्सु आहे त्याच्या वाङ्मयांत ओजोगुण ओळीओळींतून रसरसत असावा यांत काय आश्चर्य ! मात्र सावरकरांच्या वाणींतील हें ओज सामान्य दर्जाचें नाही. सभांतील भाषणें किंवा वृत्तपत्रांतील लेख यांतून ज्या प्रकारचा जोरकसपणा आढळतो त्यापेक्षा त्यांच्या वाणींतील ओज अगदी निराळ्या प्रकारचें आहे. त्यांच्या वाङ्मयांतील ओज जें मनाला इतकें मोहित आणि विस्मित करतें, त्याचें मुख्य कारण असें की त्याचा आविष्कार हा कल्पकतेने युक्त व म्हणून अत्यंत भव्य असा असतो. त्यांनी ऐन तारुण्यांत लिहिलेल्या मॅझिनीच्या चरित्रांत व कांहीं पोवाड्यांतहि जोरकसपणा भरपूर आहे; पण कल्पकता मात्र प्रायः मुळीच नाही. उलट त्यांच्या अंदमानांतील विजनवासांत व नंतरहि लिहिलेल्या काव्यांत आणि 'माझी जन्मठेप' वगैरे गद्यग्रंथांत ओज आणि कल्पकता यांचा इतका उत्कृष्ट मेळ पडलेला आहे की, जगाच्या अभिजात वाङ्मयांत त्या ग्रंथांची साहित्यकोविदांना गणना

करावी लागेल. वर्षर्तूतील गडगडणाऱ्या काळ्याकभिन्न मेघांवर किंवा शरदृतूतील रेंगाळणाऱ्या चित्रविचित्र अभ्रांवर तरलतेने तळपणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणे त्यांच्या कल्पकतेचें या ग्रंथांतील नर्तन केव्हा रम्य तर केव्हा रोमांचकारी आणि केव्हा भव्य तर केव्हा भीषण वाटतें.

त्यांच्या वाङ्मयांतील ओजोगुणाप्रमाणेच त्यांची कल्पकताहि लोकोत्तर आहे. तिच्या विशालतेचें अभिजात स्वरूप पाहिलें म्हणजे 'न प्रभातरलं ज्योतिरुदेति वसुधातलात्' असेच अुद्गार कोणाच्याहि तोंडून निघतील. गेल्या पाअुणशे वर्षांत महाराष्ट्रामध्ये कल्पकतेच्या बाबतींत अुल्लेखनीय असे चिपळूणकर, शिवरामपंत परांजपे, श्रीपाद कृष्ण आणि अच्युतराव कोल्हटकर, केळकर, गडकरी व खाडेकर हे सातच लेखक निर्माण झालेले आढळतात. त्यांपैकी ज्यांच्या कल्पकतेला आपण अभिजात म्हणूं शकूं असे लेखक चिपळूणकर आणि परांजपे हे दोनच दाखवितां येतील. अभिजात कल्पकतेचें मुख्य लक्षण म्हणजे भव्यता. रघुवंशाच्या दुसऱ्या सर्गांत कामधेनूला घेअून परत येणाऱ्या दिलीपाला कविकुलगुरूने दिलेली 'दिनक्षपामध्यगतेव संध्ये'ची उपमा ही या भव्यतेचें अुदाहरण म्हणून सांगतां येअील. कोल्हटकर आणि त्यांचे शिष्य गडकरी यांच्या वाङ्मयांतून अशा विशाल अुपमा क्वचित् दृष्टीस पडतात ही गोष्ट खरी. पण त्यांच्या कल्पकतेचें वैशिष्ट्य चापल्य किंवा तरलता हें आहे; भव्यता हें नव्हे. अुलट चिपळूणकर आणि परांजपे यांच्या कल्पकतेचें वैशिष्ट्य भव्यता आणि विशालता हें असून त्यामुळेच त्यांचें वाङ्मय इतकें सामर्थ्यसंपन्न आणि स्फूर्तिदायक झालें आहे. सावरकरांची कल्पकताहि याच वर्गांत मोडते. ती फुलपाखराप्रमाणे तरल आणि मोहक नाही, तर गरुडाप्रमाणे तेजस्वी आणि भव्य आहे. तिच्यांत झऱ्याचा अवखळपणा नाही, तर सागराचें गांभीर्य आहे; व फुलवेलीचें मार्दव नाही, तर विद्युल्लतेची प्रखरता आहे. 'जगन्नाथाचा रथोत्सव' ही त्यांची अेकच कविता जरी वाचली तरी त्यांच्या कल्पकतेच्या वैशिष्ट्याचा प्रत्यय येअील.

त्यांच्या ओज आणि कल्पकता या गुणांप्रमाणेच त्यांचें ध्येयदर्शित्वहि अनन्यसामान्य वाटतें. त्या दृष्टीने त्यांच्या वाङ्मयाचे दोन कालखंड पाडतां अेतील. १९११ सालीं जन्मठेपेची शिक्षा होअीपर्यंत त्यांच्या हातून जें वाङ्मय निर्माण झालें, त्यांत विशुद्ध स्वातंत्र्याच्या ध्येयाचा पुरस्कार केलेला आहे. त्यानंतरच्या, विशेषतः गेल्या बारा वर्षांतील, वाङ्मयांत स्वातंत्र्याच्या पुरस्काराला गौण स्थान मिळून, हिंदु जातीच्या पुनरुत्थानाच्या ध्येयाला प्रामुख्य मिळालें. पहिल्या म्हणजे स्वातंत्र्याच्या ध्येयाची स्फूर्ति त्यांनी मॅझिनीप्रभृति पाश्चात्य स्वातंत्र्योपासकांचें तत्त्वज्ञान, कै. शि. म. परांजपे यांचें 'काळ' पत्र आणि शिवकालीन अितिहास यांच्यापासून घेतली होती. अुलट दुसऱ्या म्हणजे हिंदु जातीच्या पुनरुत्थानाच्या ध्येयाची स्फूर्ति त्यांनी अखिल भारताच्या अुज्ज्वल प्राचीन अितिहासापासून घेतलेली आहे. त्यांचा मॅझिनीवरील चरित्रप्रबंध व पोवाडे हे त्यांच्या स्वातंत्र्याच्या ध्येयाचे निदर्शक आहेत; तर 'सन्यस्त खड्ग' नाटक व 'गोमांतका'दि काव्यें हीं हिंदु जातीच्या पुनरुत्थानाच्या ध्येयाचीं द्योतक आहेत. त्यांच्या या दोन्ही बाबतींतील ध्येयदर्शित्वाला लोकोत्तर म्हणावयाचें तें या कारणामुळे की, स्वातंत्र्याचा पुरस्कार त्यांच्या अितक्या निर्भयतेने कोणीं केला नाही व हिंदु जातीच्या पुनरुत्थानाचा पुरस्कार त्यांच्या अितका व्यापकतेने कोणीं केला नाही. शक्याशक्यतेच्या अगर युक्तायुक्ततेच्या मर्यादा पाहणें किंवा पाळणें हें मुळी त्यांच्या युयुत्सु मनोवृत्तीला मानवतच नसावेंसें दिसतें. त्यामुळे असें होतें की, ते ज्या ध्येयाचा पुरस्कार करतात त्याला अत्यंत प्रभावी, अत्यंत प्रखर स्वरूप प्राप्त होअून त्यांच्या तद्विषक वाङ्मयांत रणघोषणेचा ओघ संचरतो.

ग. त्र्यं. माडखोलकर (महाराष्ट्र)

---

परीक्षणें

# व्यक्ति आणि वाङ्मय

---o---

(लेखक: श्री. के. क्षीरसागर, बी. ए.; प्रकाशक: य. गो. जोशी; मूल्य १॥ रु.)

## २

### वाङ्मय

ग्रंथाचा तिसरा भाग म्हणजे श्री. क्षीरसागरांच्या बुद्धिवैभवाचें क्रीडाङ्गण आहे. पटवर्धन व सावरकर या दोन वीरांच्या घरीं ज्या विचारांचे 'वार' लागले त्यांना चापण्याचें धैर्य प्रथम श्री. क्षीरसागरांनी दाखविलें. भाषाशुद्धीवाल्यांच्या विचारसरणीला त्यांनी ज्या मुद्यावर विरोध केला आहे ते मुद्दे प्रथमदर्शनींच आकर्षक वाटतात. हेंच त्यांच्या लेखणीचें खरें सामर्थ्य आहे. कांही मतें अशीं असतात की त्यांनी जन्मतःच लोकप्रियतेचा विमा अुतरलेला असतो! भाषाशुद्धि हें मत अशापैकीं होय! भाषाशुद्धीला विरोध हा विचार बेधडक मूर्खपणांत काढावा अितकी भाषाशुद्धीविषयीं जबरदस्त लोकप्रियता आहे. परंतु हें जाणूनहि श्री. क्षीरसागरांनी त्या लोकप्रियतेला प्रथमदर्शनीं स्तब्ध केलें! पण कोठे तरी जाहीर ठिकाणीं टोला मारून प्रसिद्धी मिळवावी अशा वृत्तीने मात्र हा विरोध केला नाही. भाषाशुद्धीच्या पुरस्कर्त्यांच्या प्रयत्नाने भाषाच नाहीशी होत आहे असा धोका श्री. क्षीरसागरांना दिसल्यावर त्यांनी त्यांना सावध करण्यासाठी हे लेख लिहिले. या लेखांतून भाषाशास्त्राचीं मूलतत्त्वें, कांही जगमान्य भाषांचा अितिहास व मराठी भाषेचीं स्थित्यंतरें यांच्या अैतिहासिक व शास्त्रीय आधाराने श्री. क्षीरसागरांनी आपलें मतप्रतिपादन व प्रतिपक्षीयांना विरोध केला आहे. परंतु यालेरीज या लेखांत वादविवादाचें कौशल्य किंवा 'युक्त्या' हाहि अेक भाग आहे व त्यामुळे भाषाशास्त्राच्या विषयावरील ही चर्चा मनोवेधक झाली आहे. प्रो. पटवर्धनांचें प्रत्युत्तर छापून आपल्या म्हणण्याला निःपक्षपातीपणाहि मिळवला आहे.

भाषाशुद्धीवाल्यांना त्यांचा मुख्य विरोध दोन प्रकारचा दिसतो. अेक असा की, भाषेची अशुद्धि ही अेक नैसर्गिक गोष्ट आहे. व दुसरें शुद्धीच्या अट्टाहासाने हे लोक भाषा विद्रूप करीत आहेत! भाषेंत शिरलेल्या परकीय शब्दांचा धसका घेणें व त्यांत परकीयांचा द्वेष व स्वतःचें देशप्रेम हें पेटवून घेणें हा आततायीपणा आहे असें श्री. क्षीरसागरांनी स्पष्टपणें म्हटलें आहे. भाषेची स्थिति कांहीशी आरोग्यशास्त्रासारखी आहे. आरोग्याला विघातक अशीं कारणें नैसर्गिक परिस्थितीअितकींच नित्य असतात व त्याच वातावरणांत आरोग्यदायक अशाहि गोष्टी असतात. आरोग्यविघातक कारणांचा नाश करण्याच्या प्रयत्नांची मर्यादा ओळखूनच आरोग्याचे हितावह नियम सांगणें व्यवहार्य ठरतें. कांही नियम अितके आदर्श ठरतात की, ते फक्त ध्येयासारखे पुढे ठेवतां येतात व त्यांचें स्वामित्व संभाळण्याचा प्रयत्न व्यवहाराच्या मार्गानें करावा लागतो. भाषेच्या बाबतींत परकीय शब्दांना

थोपविण्यालाहि कांही मर्यादा आहेत. परकीय शब्द येणें हें नैसर्गिक आहे, व त्यांच्या नैसर्गिक येण्याचें भाषेवर अतिक्रमण थांबविण्यासाठी भाषाशुद्धीचे प्रयत्नहि नैसर्गिक मार्गानेच करावे लागतात. धर्मशुद्धि व धर्मान्तर यांच्या बाबतींत जो व्यवहार पाळला जातो तोच भाषाशुद्धीच्या बाबतींतहि पाळावा लागतो. भाषेची शुद्धाशुद्धता ठरवितांना बोलण्यांतील भाषा व लिहिण्यांतील भाषा (म्हणजेच 'भाषा व लेखन') यांतील परिणामाच्या दृष्टीने महत्त्वाची कोणती हेंहि पाहिलें पाहिजे. भाषेंतील ग्रन्थकार भाषा बनवीत असतात व तेंच भाषेचें शाश्वत स्वरूप होय. बोलीभाषेला तितकें महत्त्व नाही असें श्री. क्षीरसागरांचें म्हणणें आहे व या दृष्टीनेच त्यांनी भाषाशुद्धीवाल्यांच्या लेखनांतील 'दुष्ट' भाषेवर टीका केली आहे. त्यांत आजचे पटवर्धन १९२७ साली परकीय शब्दांचे पुरस्कर्ते, पाठीराखे होते. या आधारामुळे श्री. क्षीरसागरांना आपला विरोध चांगलाच नटवतां आला आहे! त्यांतच त्यांना भाषाशुद्धीवाल्यांच्या शुद्धीकृत भाषेंतच 'सरकार' शब्द सांपडला! कित्येक विकृत विचित्र शब्द तयार केलेले सांपडले!! या गोष्टीमुळे श्री. क्षीरसागरांच्या विरोधाला बळ मिळालें आहे.

मराठी म्हणजे तरी काय? मराठींत कानडी शब्द आहेत ते कां परकीय ठरवीत नाही? इंग्रजी व फारशी या दोनच भाषांना विरोध करण्यांत ही चळवळ राजकीय आहे असेंहि श्री. क्षीरसागरांचें म्हणणें आहे. परकीय शब्द काढून तेथे विचित्र संस्कृत शब्द तयार करून भाषाशुद्धीच्या ऐवजी विकृति होते! कांही परकीय शब्दांनी मराठींतील कोणताहि शब्द मारला नाही, उलट कल्पना व नादमाधुर्य यांची भर घातली आहे व अशा रीतीने भाषावृद्धि केली आहे. कांही परकीय शब्द अगदी निरुपद्रवी आहेत. इत्यादि कारणांसाठी शब्दशुद्धि करतांना शब्दसंग्रह कमी करून भाषा दुबळी करणें हें आत्मघातकीपणाचें आहे. शुद्धि म्हणजे विडंबन नव्हे हें श्री. क्षीरसागरांनी बजावलें आहे.

भाषाशुद्धीवाले ज्या भाषांचे दाखले देतात त्या भाषांची व मराठीची स्थिति सारखी नाही असे श्री. क्षीरसागरांचे सारांशानें विचार आहेत. त्यांचा शेवटचा मुद्दा असा की, अिंग्रजीचें घरोंदारीं होणारें आक्रमण थांबवल्याखेरीज खरी भाषाशुद्धि होणार नाही. आज अिंग्रजी भाषेंत किती तरी परकीय शब्द आहेत. पण ते बाहेर न फेकतां त्या भाषेने ते पचवले आहेत. तसलें सामर्थ्य मराठींत आल्याखेरीज नुसती शब्दशुद्धीची शाब्दिक चळवळ करून भाषेचें वैभव वाढणार नाही.

हीं सगळीं मतें माण्डतांना श्री. क्षीरसागर यांनी जी वादपद्धति अवलम्बिली आहे ती मात्र बऱ्याच ठिकाणीं अगदी खास चिपळुणकरी शास्त्रीपन्थाची आहे असें खेदाने म्हणावें लागतें. शब्द कसे रूढ होतात, रूढ होणाऱ्या शब्दांचें सामर्थ्य काय असतें वगैरे भाषाशास्त्रविषयक विवेचनाच्या बाबतींत त्यांचा व त्यांच्या प्रतिस्पर्ध्यांचा फारसा विरोध दिसत नाही. या चळवळीच्या मागे राजकीय मनोवृत्ति आहे असा श्री. क्षीरसागर यांचा आरोप प्रो. पटवर्धनांनी निराळ्या शब्दांत जवळ जवळ मान्य केला आहे. परन्तु तरी श्री. क्षीरसागरांचा आक्षेप असा आहे की भाषाशुद्धीवाले जी भाषा लिहितात ती मराठी भाषा विद्रूप करणारी आहे. त्यांचे शब्द विचित्र आहेत. ते शब्दशुद्धीच्या प्रयोगांत वाक्प्रयोगांची शुद्धता लक्ष्यांत ठेवीत नाहीत व त्यांच्या सर्वसाधारण लोकप्रियतेमुळे त्यांच्या चळवळीचें अनुकरण होऊन फारच हानि होत आहे. श्री. क्षीरसागर यांच्या लेखांत त्यांनी शब्दांचे अर्थभेद व श्रुतिसुभगता या बाबतींत दाखविलेली रसिकता व मार्मिकता निःसंशय प्रशंसनीय आहे. त्यांनी भाषाशुद्धीवाल्यांच्या लेखांतून दाखविलेलीं विकृत भाषेचीं उदाहरणें कोणासहि पटण्यासारखीं आहेत. त्यांनी

निवडलेलीं शुद्ध भाषेचीं अवतरणेंहि मान्य होण्यासारखीं आहेत. पण भाषाशास्त्राचीं तत्त्वें व विकृत भाषेचा तिरस्कार दाखवितांना वैयक्तिक टीकेच्या भरांत त्यांच्या लेखाची तत्त्वशुद्धि भ्रष्ट होऊं पाहते तें आम्हांस खेदकारक वाटतें. या चळवळीची आवश्यकता त्यांनाहि पटते. त्यांचा राग चळवळीच्या पुढाऱ्यांवर आहे. पुढारीहि किती प्राञ्जल आहेत हें श्री. क्षीरसागर यांच्या 'माधव–जूलियन' यांच्यावरील लेखांवरून दिसतें. मग ही वैयक्तिक टीकेची धार देण्याची जरूर काय ! किं एका लोकप्रिय गोष्टीच्या विरोधाकडे लक्ष्य वेधण्यासाठीं हा मार्ग अवलम्बला आहे !

शेवटीं आम्हांस असें वाटतें की, भाषाशास्त्राची श्री. क्षीरसागर यांची चिकित्सक बुद्धि भाषाशुद्धीस अुपकारकच ठरेल. व हें ओळखून भाषाशुद्धीच्या चळवळींत त्यांनी जातीने पुढाकार घ्यावा. अिंग्रजीचें अतिक्रमण थांबविण्यासाठी सामर्थ्यवान मराठी भाषेचें वाङ्मय आघाडीवर उभें करावें. तत्त्व मान्य असल्यावर व्यक्तिविषयक आवडीनिवडीची चिकित्सा करण्यांत कालापव्यय होऊं नये. श्री. क्षीरसागर यांच्या लेखांनी भाषाशुद्धीच्या प्रयत्नांत वेळींच जागरूकता उत्पन्न झाली आहे. ती हितावह आहे. आणि अशी जागरूकता प्रचलित वाङ्मयांत उत्पन्न करणें हेंच या ग्रंथाचें वैशिष्ट्य आहे.

प्रस्तावनाकारांनी तर श्री. क्षीरसागरांच्याहि पुढे जाअून भाषाशुद्धीवाल्यांवर हीनगंडाचा आरोप केला आहे. तो करतांना त्यांनी व्यक्त केलेला स्वत्वाभिमान प्रशंसनीय आहे. तरी त्यांत-उत्पन्न केलेल्या निर्धास्तपणाचा आवेश हा एखाद्या वेळीं अहंगण्डाच्या थराला जाईल अशीहि भीति वाटते. श्री. क्षीरसागरांसारखी टीकालेखनपद्धति–श्री. माडखोलकरांच्या शब्दांत 'वाङ्मयांत अपूर्व आहे व अुपकारक आहे'.

—गं. भा. निरंतर

---

अनुक्रमणिका

# पत्रव्यवहार

## शास्त्रीय परिभाषा

प्रिय सम्पादक महाशय,

आपण आपल्या पत्रिकेंत पारिभाषिक शब्दसङ्ग्रह छापल्याबद्दल आपले आभार मानावे तितके थोडेच आहेत. मला त्या शब्दांचा बराच अुपयोग होत आहे. ह्या पत्रांत मी आपणांस दोन गोष्टींविषयी लिहूं अिच्छितों.

पहिली म्हणजे मला आपणापासून Calculus व Trigonometry ह्या दोन विषयांत येणाऱ्या—अगर योजिल्या जाणाऱ्या शब्दांस प्रतिशब्द पाहिजेत. ह्या शब्दांची अडचण भासल्यामुळे, आपण मला कदाचित् मदत करूं शकाल ह्या आशेने, हें पत्र लिहीत आहें. आपल्या पत्रिकेंत ह्याविषयी शब्द कोठे प्रसिद्ध झाले असल्यास अगर होत असल्यास आपण पत्रिकेचा तो अङ्क मला पाठविल्यास मी आपला फार आभारी होअीन. व ह्या खटाटोप करण्यास लागलेला सर्व खर्च मी आपणांस, आपण आंकडा कळविल्याबरोबर धाडून देअीन. आपण जर Scientific शब्दकोश प्रसिद्ध केला असाल तर तोच पाठवून द्यावा.

दुसरी गोष्ट म्हणजे आपण विजेच्या संबंधी प्रतिशब्द सुचविले आहेत. त्यांत मला बदल सुचवावयाचे आहेत. ते येणेंप्रमाणें.

| | आपला शब्द | माझा शब्द |
|---|---|---|
| Alternating Current | यातायातीक वहाळ | लहरी प्रवाह |

[कारणें:—यातायातीक हा शब्द बोजड आहे. प्रवाह हा शब्द नित्य परिचयाचा आहे. लहरी शब्दाचे दोन अर्थ-अेक बदलणारा व दुसरा तरंगमय. दोन्ही अर्थांत तो शब्द चांगल्या रीतीने लागू पडतो. [ येती सिंधुच्या लहरी, नम्र होतां जाती दूरी । ]

| | | |
|---|---|---|
| Charged | अुचयी | भारलेला |
| Possitive charge | | धनभार |
| Negative ,, | | ऋणभार |

[कारण:—अुचयी शब्द अुत्तम असला तरी नित्य परिचयाचा नाही. भारलेले मंदिर वगैरे शब्द रोजच्या अुपयोगांतले आहेत.]

| | | |
|---|---|---|
| Current | वहाळ, वहा. | प्रवाह |
| Direct Current | सरळ वहाळ | सतत प्रवाह |

[Direct Current ने अिंग्रजींत मुख्यतः Continuous Current असा अर्थ दर्शविला जातो.]

| | | |
|---|---|---|
| Receiver | | ग्राहक |
| Transmitter | | संदेशक |

तसेंच ह्याविषयी लिहितांना व्होल्ट, ॲम्पेअर वगैरेसारखे शब्द बदलण्याच्या भरांत पडूं नये असें वाटतें. हे व असले शब्द सर्व देशांच्या प्रतिनिधींनी पसंत करून जगाकरिता ठरविले आहेत. जर्मनी, फ्रान्स वगैरे देशांत सुद्धा हेच व असलेच शब्द अुपयोगांत आणतात.

असो. वर लिहिलेले शब्द व सूचना माझ्या मतें विचारांत घेण्यास योग्य आहेत असें वाटल्यावरून आपणापुढे विचाराकरिता मांडीत आहें.

आपल्यास दिलेल्या तसदीची माफी करून आपण मला अडचणींतून बाहेर पडण्यास मदत कराल अशी आशा बाळगून मी आपली रजा घेतों.

आपला

बेडफर्ड शा. पु. कान्हेरे

## लिपिसमिती निर्णय

श्री. संपादक, महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका, महाराष्ट्र साहित्य परिषद्, पुणें. सा. न. वि. वि.

आपण विनंती केल्यावरून म. सा. प. च्या लिपिसमितीच्या निर्णयासंबंधी मी आपलें मत देत आहें :—

निर्णय १ ला— शिरोरेषा गाळल्यापासून खरोखरच सोय होते किं नाही याबद्दल शंका वाटते. बरीच सोय होत असल्यास गाळावी. पण फारशी सोय नसल्यास गाळूं नये. शिरोरेषेमुळे अक्षरांना अेक प्रकारचा भरीवपणा व आटोपशीरपणा येतो. ती शब्दांचा वेगळेपणा दाखवायलाहि अुपयोगी पडते व डोळ्यांना सरळ रेषेंत जायला मदत करते.

निर्णय २ रा—हा निर्णय सर्वस्वीं अग्राह्य आहे. कारण तो अशास्त्रीय आहे व त्यापासून म्हणावा तसा फायदाहि नाही. 'अ' कांही 'क'सारखें व्यंजन नव्हे किं त्याला स्वरांचीं चिन्हें लावीत जाअून बाराखडी करावी. 'ई' म्हणजे 'अी' म्हणजे अ+ई हें समीकरण चुकीचें व गैरसमज अुत्पन्न करणारें आहे. शिवाय अशी बाराखडी केल्याने मुद्रणपेटींतील ५।७ खाने कमी झाले असतील; पण आता प्रत्येक स्वर काढायला मुद्रकाला दोनदा हात अुचलावा लागत असेल व त्यामुळे दुप्पट अुशीर लागत असेल त्याची वाट काय !

या सर्व निर्णयांत मुद्रणाची सोय हा अेक मात्र सर्वभक्षक विचार प्रबल दिसतो. आपल्या बुद्धिमत्तेने बदलतां येण्यासारख्या अेका यंत्राची अेवढी मिजास चालू देअून आपल्या जिव्हाळ्याच्या व शास्त्रीय लिपींत अुलथापालथ करणें, अितकी की ती देवनागरी म्हणून ओळखूं देखील यावयाची नाही, हें सर्वथा अयोग्य आहे. यंत्रासाठी लिपी बदलण्यापेक्षा लिपीसाठी यंत्र बदलण्याची हिम्मत ठेवावी व जोराची खटपट करावी. स्पेलिंगच्या संबंधात अिष्ट जुळणी करतां येण्यासारखें अेखादें लिनोटाअीपसारखें यंत्र निघाल्यास या अुलथापालथीचा पुढे पश्चात्ताप वाटेल. शिवाय अेवढी अुलथापालथ करण्यापेक्षा रोमन लिपीच स्वीकारलेली काय वाअीट ! सारांश अितकें मुद्रणाच्या भक्ष्यस्थानीं जाअूं नये.

निर्णय ३ रा— अमान्य. कारणें–(१) अक्षरांचा सुटसुटीतपणा व आटपशीरपणा जातो. (२) अिङ्ग्रजी स्पेलिंगसारखें भूत देवनागरींत शिरूं पाहतें. (३) ही भयंकरच अुलथापालथ होते.

निर्णय ४ था.— गरज नाही.

निर्णय ५ वा.— ही सूचना मात्र मान्य आहे.

निर्णय ६ वा— मान्य.

निर्णय ७ वा— अमान्य. सध्याप्रमाणेच असावा. वाटल्यास र्‍न असा काढावा.

निर्णय ८ वा— अमान्य. अनुच्चारित अनुस्वार गाळून टाकावे. अनुस्वार हल्लीप्रमाणेच द्यावे.

निर्णय ९ वा— चालेल.

निर्णय १० वा— मान्य.

निर्णय ११ वा— योग्य.
निर्णय १२ वा— ठीक.
निर्णय १३ वा— बिन्दु अक्षराखाली द्यावा.
निर्णय १४ वा— ठीक.

हें थोडक्यांत दिलें आहे. याचें विवेचन मीं आपल्या अेका लेखांत केलें आहे तो प्रसिद्ध्यर्थ पाठविला आहे.

व्याकरण समितीचे निर्णय ठीकच दिसतात. मात्र शक्य तोवर पाणिनीचें अनुसरण करावें असें वाटतें.

आपला,
श्री. ल. पांढरीपाडे

---

# स्त्रियांच्या म्हणी

[ ऑक्टोबर १९३७ च्या अंकावरून पुढे चालू ]

३९३ पुसा (पौष महिन्यांत) अन् थंडी दिसा (दिवसा).
३९४ ज्याची पै त्याला लई.
३९५ लाभ ना नफा, रिकामा धका.
३९६ गेलें गत (वर्ष), फाटलें खत (मुदत संपल्यावर खत निरुपयोगी).
३९७ वाकड्या मेढीला वाकडा दर (किंमत).
३९८ ठिकाण नाही लग्नाला अन् कोण घेईल मुलाला ? (बाजारांत तुरी भट भटणीला मारी या अर्थी).
३९९ आधी झुंबरा सोन्याचा होअूंदे मग ठेंच लागली तरी चालेल.
४०० असून अडगळ नसून खोळंबा.
४०१ पत्रावळी आधी द्रोणा, तो जांवअी शहाणा. (पत्रावळीपेक्षा द्रोण लावणें कठीण, म्हणून तो ज्याला लावतां येअील तो जांवई शहाणा. कोंकणांत जांवयाची परीक्षा करतांना त्याला द्रोणपत्रावळी लावितां येतांत किं नाही हें पाहत असत.)
४०२ कामावें तें सामावें.
४०३ दसऱ्यांतून वांचेल तेव्हा दिवाळीचा दिवा पाहील (रेड्याला उद्देशून).
४०४ सरली सुगी, अन् बसली उगी.
४०५ बोलक्या सराफाचें सोनपितळ खपतें; अबोल्याचें शंभरनंबरी सोनें देखील खपत नाही.
४०६ नांव नावरांचें, सुख मातबरांचें (गरिबांसाठी केलेल्या योजनांचा फायदा श्रीमंत घेतात).
४०७ दोघींचा सांगोसा, तिघींचा अडथळा.
४०८ सात पांच रंभा, पाण्याचा नाही टिंभा (थेंब).

नीळकंठ शंकर नवरे, ट्रेनिंग कॉलेज, पुणें.

(म. सा. प. ११-२-६)

# संपादकीय



## मुंबअी साहित्य संमेलनाकरिता—

हा अंक वाचकांच्या हातीं सम्मेलनापूर्वीच पडेल. यंदाचें मुंबअी साहित्य सम्मेलन मुंबअी-करांच्या अपूर्व उत्साहामुळे दरबारी थाटांत साजरें होण्याचा योग दिसतो. प्रान्ताची राजधानी व जगांतील एक अग्रेसर नगर या कीर्तीस साजेशा समारंभाने सम्मेलन पार पाडण्याचा, मुंबअी साहित्य-संघाने चंग बांधला आहे. आम्ही त्यास या कार्यांत यश चिंतितों.

परंतु संमेलनाच्या या प्रतिवार्षिक सोहळ्यांतून महाराष्ट्र वाङ्मयास चिरस्थायी स्वरूपाचें कांही कार्य निष्पन्न व्हावें अशी मनीषा मराठी साहित्यिक आज अनेक वर्षें करीत आहेत. सुदैवाने सम्मेलन कार्यकर्त्यांचा व प्रतिनिधींचा आजवर बहुतांश वेळ घेणारा परिषद्-सम्मेलन वाद आता मिटला आहे व मुंबअीकर साहित्यिकांस परिषदेच्या नियंत्रणाअैवजी साहित्याच्या सेवेचा विचार करण्यास भरपूर वेळ यंदा मिळणार आहे. सम्मेलनाच्या निमित्ताने इंदूरकरांनी मराठीस साहित्य समालोचनाचें सुंदर लेणें नुकतेंच श्रमपूर्वक तयार करून चढविलें आहे. अशा तऱ्हेची प्रासंगिक पण चिरस्थायी ग्रंथनिर्मिती मुंबअी संमेलनामुळे होअीलच.

तथापि याहूनहि कांही कायम स्वरूपाची योजना सम्मेलनांत आंखली जाणें इष्ट आहे यांत शंका नाही. व त्या दृष्टीने कांही मित्रांशीं चर्चा करून सुचलेल्या सूचनांची रुपरेषा मुंबअी-कर साहित्यिक यजमान व त्यांचे पाहुणे यांच्या विचारांकरिता येथे देत आहें.

मराठी वाङ्मयांत प्रत्यहीं भर पडत आहे परन्तु योग्य उत्तेजन व रसिकग्रहण यांच्या अभावाने कांही कृती कालोदरांत विलीन होतात वा जनतेच्या दृष्टोत्पत्तीस येत नाहीत. निर्धन-तेच्या ग्रीष्मांत अुपेक्षेच्या शुष्क गलितपत्रांआड पडून कित्येक अमृतफलें कुजून जात आहेत. विविधज्ञानविस्तारासारखें सतत पाअुणशे वर्षें महाराष्ट्र सारस्वताची बहुमोल सेवा करणारें मासिक अशा परिस्थितींत सांपडावें हें या उदास वस्तुस्थितीचें अेक प्रत्यंतर होय.

परिषद् वा सम्मेलन यांना अशीं मासिकें, ग्रन्थ अित्यादींना या परिस्थितींतून वांच-विण्याइतकी शक्ति अद्याप आली नाही हें खरें; तथापि कांही साहित्यफळें अमृतफळें आहेत हेंहि जनतेस वारंवार सांगून त्यांच्या अभिरुचीस वळण लावण्याचा प्रयत्न करणें या संस्थांस शक्य आहे.

तर्खेड व भोजराज बक्षिसें हें कार्य थोडेंबहुत करीत आहेत, तथापि सम्मेलनप्रसंगीं मागील कांही मर्यादित काळखंडांतील वाङ्मयास—विज्ञान, कला, कादम्बरी, नाट्य, मासिकें अित्यादि—परिषदेने प्रशस्तिपदकें देण्याचा अुपक्रम केल्यास या कार्यास सातत्य व निश्चिती प्राप्त होईल. प्रशस्तिपदकामुळे खर्च कमी येऊन कार्य मात्र अधिक होईल. या योजनेच्या नियमां-करिता एखादी समिति निश्चित करणें, पदकांकरिता दरवर्षी शंभर सव्वाशे रुपये खर्च लागेल त्याची व्यवस्था करणें अित्यादिचा विचार, ही योजना हातीं घेण्यास योग्य ठरल्यास, सम्मे-लनांत होअील अशी अपेक्षा आहे. विचारास चालना मिळावी म्हणून ही केवळ टांचणवजा सूचना करीत आहें.

अनुक्रमणिका

तर्खड पारितोषिकाच्या बाबतींत अेका गोष्टीचा अुल्लेख करणें अगत्य वाटतें. हें पारितोषक ग्रन्थकर्त्यांनी मुद्दाम याचना करून परीक्षेकरिता पाठविल्या जाणाऱ्या ग्रन्थांपैकी अेका ग्रन्थास मिळतें. या योजनेंतील वैगुण्य अगदी अुघड आहे. आलेल्या ग्रन्थांतूनच निवड करावयाची असल्याने दरवर्षी मराठींतील अुत्कृष्ट ग्रन्थाचीच निवड होअील असें निश्चित म्हणतां यावयाचें नाही. सुदैवाने आतांपर्यंतचीं पारितोषिकें योग्य ग्रन्थास मिळालीं ही गोष्ट वेगळी, परन्तु या पारितोषिकास पात्र होण्याकरिता किमान गुणमर्यादा ठेवणें व ते अखिल महाराष्ट्र सारस्वतांतील ग्रन्थांस खुलें राहणें अवश्य आहे.

ता. २३-३-३८.

मोहन ज्ञा. शहाणे

---

# वाङ्मयवार्ता

| | |
|---|---|
| ता. ५ फेब्रुवारी | 'मराठी साहित्य समालोचन' प्रकाशनसमारंभ इंदूर येथे. हस्तें राजमाता सौ. चंद्रावती मासाहेब होळकर. |
| ता. ६ फेब्रुवारी | मुंबअी साहित्यसम्मेलन स्वागतमंडळातर्फे श्री. वि. दा. सावरकर यांची सम्मेलनाध्यक्ष व न्या. मू. बॅ. जयकर यांची स्वागताध्यक्ष म्हणून निवडणूक. |
| ता. २५ फेब्रुवारी | 'परामर्श' (लि. वि. वा. आंबेकर) व 'तुटलेले दुवे' (लि. माधव-ज्यूलियन) प्रकाशनसमारंभ, पुणें येथे. अध्यक्ष श्री. द. वा. पोतदार. |

---

# बन्धमुक्त वाङ्मय (मध्यप्रान्त)

(१) लो. टिळक यांचीं व्याख्यानें—ले. अेस्. अे. बर्वे; (२) श्री समर्थ रामदास स्वामी यांचा पोवाडा—ले. श्री. व्ही. अे. वाघ; (३) अरविन्द घोष यांचीं व्याख्यानें (अिङ्ग्रजी); (४) अरविन्द घोष यांचीं व्याख्यानें (मराठी) —ले. भागवत; (५) अरविन्द घोष यांचा दोन भाषणें—अिङ्ग्रजी; (६) मुरारबाजीचा पोवाडा—श्री. डी. अेन्. आपटे; (७) विजापूरच्या आदिलशाहीचा शेवट अथवा श्रीशिवराय छत्रपतींचीं अद्भूत कारस्थानें—ले. ना. ब. हर्डीकर; (८) लो. मा. बाळ गंगाधर टिळक व प्रो. शि. म. परांजपे यांच्यावर १९०८ सालीं झालेले राजद्रोहाचे खटले—ले. भागवत, पुरोहित, पांगारकर वगैरे; (९) मुस्तफा कमाल पाशा—ले. ना. ना. मंडलीक; (१०) टिळकांचीं भाषणें.—प्र. ह. र. भागवत; (११) काळावरील राजद्रोहाचा खटला—प्र. गो. धों. दंडवते.

---

## डेक्कन व्हर्न्याक्युलर ट्रान्सलेशन सोसायटी, पुणें

### १९३७-३८ सालीं बक्षीस दिलेल्या पुस्तकांची यादी—सप्टेंबर १९३७ अखेर

| क्रम | पुस्तकाचें नांव | कर्त्याचें नांव | बक्षीसाची रक्कम रु. | कोणत्या फंडांतून |
|---|---|---|---|---|
| १ | महाराष्ट्र शब्दकोश, विभाग ५ वा | रा. य. रा. दाते | १२५ | |
| २ | संततिनियमन (जननाशक्यता) | डॉ. रा. अ. राशिरकर | ३० | |
| ३ | व्यावहारिक ज्ञानकोश, खण्ड २ | रा. ग. रं. भिडे | ७० | |
| ४ | बालरोग व त्यांची होमिओपाथिक चिकित्सा | डॉ. गो. स. पळसुले | ६० | |
| ५ | सुखाचा शोध | प्रो. वि. स. गोगटे | ३० | |
| ६ | सङ्गीत शास्त्रकार व कलावन्त यांचा अितिहास | रा. ल. द जोशी | ३० | |
| ७ | खरा उद्धार | रामतनय | ४० | |
| ८ | बन्दूक कशी अुडवावी ! | कॅ. ग. वा. गोडबोले | ३० | |
| ९ | प्रसूति-तन्त्र | डॉ. वि. म. भट | ४० | |
| १० | आर्यांचे संस्कार—पूर्वार्ध | रा. धुं. ग. दिक्षित बापट | ४० | |
| ११ | योगीश्वर याज्ञवल्क्य व शुक्लयजुर्मुनिमाला | रा. ग. गो. कोलगंडे | ४० | मुळ्ये प्राइझ |
| १२. | शारदेचा दरबार | रा. कृ. धों. शिराळकर व रा. एन्. के. चितळे | १५ | केळकर फंडांतून |
| १३ | वसअीची मोहीम | रा. य. न. केळकर | १०० | इचलकरंजी प्राईझ |
| १४ | अेकनाथी भागवतादर्श | रा. र. म. लकडे | २१ | दि. ब. गोडबोले प्राईझ |

| क्रम | पुस्तकाचें नांव | कर्त्याचें नांव | बक्षीसाची रक्कम रु. | कोणत्या फंडांतून |
|---|---|---|---|---|
| १५ | ऑईनस्टाईन प्रणीत सापेक्ष दर्शन | भारद्वाज | ४० | संस्थेच्या फंडांतून |
| १६ | श्याम | रा. पां. स. साने | ३० | ,, |
| १७ | शाहीर खाडीलकर यांचे पोवाडे | रा. पां. द. खाडीलकर | ३० | ,, |
| १८ | भारतामृत | रा. ग. रा. हवलदार | ३० | ,, |
| १९ | सार्थ पिंगल छंदःसूत्र | पं. शिवराम्रशास्त्री शिंत्रे | ३० | ,, |
| २० | व्यायाम ज्ञानकोश, खंड २ | रा. द. चिं. मुजूमदार | ९० | ,, |
| २१ | शालेय चित्रकला | रा. भ. स. भडकमकर | ४० | ,, |
| २२ | मुद्रण प्रवेश | रा. शं. रा. दाते | ३० | ,, |
| २३ | गोवर्धन ब्राम्हणांचा इतिहास | रा. महादेवशास्त्री दिवेकर | ३० | ,, |
| २४ | भारतवर्षीय मध्ययुगीन चरित्र कोश | रा. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव | १४३ | देशमूख फंडांतून |
| २५ | विज्ञानप्रणीत समाजरचना | रा. पु. ग. सहस्रबुद्धे | ३५ | दक्षिणा फंडांतून |
| २६ | सार्थ उपनिषदें | रा. वागेवाडीकर | प्रशंसापत्र | |
| २७ | शेतकऱ्यांचा कैवारी | रा. रा. जो. शिंदे | ,, | |
| २८ | विश्राम | रा. पां. स. साने | ,, | |
| २९ | आपली पुनर्घटना | रा. मो. शि. नामजोशी | ,, | |
| ३० | गुलाब मंद | रा. ज. ज. सरदेसाई | ,, | |
| ३१ | बहर | रा. व. रा. वैद्य | ,, | |
| ३२ | ओघळलेले मोती | रा. वा. वि. जोशी | ,, | |
| ३३ | आग्रहायणी | रा. महाराष्ट्रीय | ,, | |
| ३४ | सच्चिकित्सा प्रकाशिका | रा. के. ल. दसरी | ,, | |

# परिषद्वार्ता

**कार्यकारी मंडळ** — १३ मार्च १९३८ रोजीं भरलेल्या सभेंत आपटे वाचन मन्दिर, अचलकरंजी, व श्री महाराष्ट्र शारदा मन्दिर, पुणें, या संस्थांस परिषदेशीं संलग्न करून घेण्यांत आलें.

परिषदेच्या प्राज्ञ व विशारद या परीक्षा उत्तीर्ण झालेल्या उमेदवारांस देण्यांत येणाऱ्या प्रशस्तीपत्रांचा नमुना (design) चित्रकलातज्ज्ञांकडून करवून घ्यावा व यासाठी रु. २५ पारितोषिक ठेवावें असें सभेने ठरविलें.

परिषदेचे उपाध्यक्ष प्रो. द. वा. पोतदार यांनी येत्या संमेलनाचा प्रसंग साधून साहित्यिकांकडून परिचयपत्रिका भरून घ्याव्या अशी सूचना मंडळास केली होती. हें कार्य संमेलनाधिकाऱ्यांनी अङ्गावर घेऊन परिषदेच्या चिटणीसांनी शक्य तितकें साहाय्य करावें असें सभेने ठरविलें.

**संमेलनवार्ता** — मुम्बईस भरणाऱ्या संमेलनाच्या अधिवेशनास ता. १५ एप्रील १९३८ शुक्रवारीं सायंकाळीं ४ वाजतां आरंभ होऊन ता. १७।४।३८ रविवारीं रात्रौ ८॥ वाजतां संमेलनाचा कार्यक्रम पुरा होईल. सारीं क्षुद्र भांडणें व वितंडवाद बाजूस सारून संमेलनाची उभारणी करितांना मुंबईकरांनी घडवून आणलेली एकजूट व त्यांची अविश्रान्त श्रम करण्याची हौस इत्यादि गोष्टी पाहिल्या म्हणजे मराठीचा ऊर्जितकाळ जवळ येऊन ठेपला आहे असें वाटत आहे. मातृभाषेच्या प्रेमामुळे तरी सारे सवतेसुभे व एकांडे शिलेदारी यांचा नायनाट होऊन महाराष्ट्रांत प्रचंड विधायक कार्य निर्माण होईल अशीं चिन्हें दिसत आहेत. ह्या प्रसंगीं परिषदेच्या सभासदांनी आपली जबाबदारी ओळखून संमेलनास अवश्य येण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

**परीक्षा**— परिषदेच्या परीक्षा यंदा प्रथमच घेण्यांत आल्या. प्राज्ञपरीक्षेच्या १७ व १८ जानेवारी व विशारदपरीक्षेच्या १९, २० व २१ जानेवारी १९३८ अशा तारखा नेमल्या होत्या. प्राज्ञपरीक्षेस इंदूर केंद्रांतून ८, नागपूर केंद्रांतून ११, पुणें केंद्रांतून १४ व मुंबई केंद्रांतून ४ असे एकूण ३७ उमेदवार होते, पैकी ६ गैरहजर राहिले. उपस्थित असलेल्या ३१ उमेदवारांपैकीं १६ यशस्वी झाले आहेत. विशारद परीक्षेस इंदूर केंद्रांतून ३ उमेदवार असून २ च उपस्थित झाले होते' यांपैकी १ उमेदवार यशस्वी झाला आहे. समवेक्षकांनी, (moderators) परीक्षकांनी व केंद्राधिकाऱ्यांनी आपापलीं कामें विनावेतन व कसोशीने केलीं व या परीक्षांचा दर्जा वाढविला याजबद्दल परिषद् त्यांची ऋणी आहे.

**इतर**— ता. ११ मार्च रोजीं कार्यकारी मंडळाने नेमलेले प्रतिनिधि प्रो. कृ. पां. कुलकर्णी व श्री. रा. दा. देसाई हे निमंत्रणावरून मुंबई विद्यापीठाच्या मराठी अभ्यासक्रम मंडळाशीं परिषदेच्या नवीन शुद्धलेखननियमांसंबंधी चर्चा करण्यास मंडळाच्या सभेंत हजर राहिले होते. नवीन नियमांच्या बाबतींत फारच थोडा मतभेद आहे असें दिसून आलें व या प्रश्नाचा निर्णय अभ्यासक्रममंडळ लवकरच लावील अशी अपेक्षा आहे. मंडळाने या कामीं जी सहानुभूति व सौजन्य दाखविलें याजबद्दल परिषदेला समाधान वाटत आहे.

अनुक्रमणिका

## नवीन सभासद

### तहह्यात

१ लोकूर, नारायण स्वामीराव, पुणें
२ वाणेकर, दत्तात्रेय केशव, मुंबई
३ जोशी, चिंतामण नीलकंठ, हैदराबाद

### मुंबई

१ सावरकर, विनायक दामोदर, मुंबई
२ तेलंग, दत्तात्रेय अनंत ,,
३ देशपांडे, प्रभाकर यशवंत, माटुंगा
४ ठोसर, सौ. सुशिला, दादर
५ लिमये, पद्मनाभ सदाशिव, विलेंपारलें
६ गोखले, शंकर काशीनाथ ,,
७ भागवत, दत्तात्रेय नारायण ,,

### सुरत

१ निमकर, विश्वनाथ कृष्ण
२ जोशी, यशवंत दत्तात्रेय
३ गुप्ते, विष्णु गंगाधर
४ जोगळेकर, जनार्दन रामचंद्र
५ गद्रे, जनार्दन त्रिंबक
६ भिसे, रामचन्द्र महादेव

### बडोदें

१ सासवडकर, गोविंद बळवंत
२ जोगळेकर, सदाशिव दामोदर
३ नेने, दत्तात्रेय रावजी
४ भावे, बळवंत श्रीधर
५ शारंगपाणी, गणेश विष्णु
६ हर्डीकर, गोविंद रघुनाथ
७ पुसाळकर, भालचंद्र वामन
८ जोशी, चिंतामण विनायक
९ आपटे, महादेव बाळकृष्ण
१० वाकनीस, त्रिंबक दिनकर
११ पटवर्धन, (सौ.) गंगूबाई
१२ देशपांडे, सदाशिव विनायक
१३ जयवंत, आनंदीबाई
१४ आपटे, दाजी नागेश
१५ लेले, मुक्ताबाई
१६ चित्रे, पुरुषोत्तम आत्माराम
१७ शेवडे, शिवराम विनायक
१८ वाकसकर, विनायक सदाशिव
१९ खिस्ति, कृष्णाबाई
२० शारंगपाणी, मोरेश्वर कृष्ण
२१ पाटकर, भास्कर नारायण
२२ टिळक, सौ. कमलाबाई
२३ काटदरे, परशुराम गोविंद

### अहमदाबाद

१ शेवडे, श्रीपाद सदाशिव
२ खाडिलकर, वामन हरि
३ खांडेकर, गणेश रामचंद्र
४ देशपांडे, शंकर गणेश
५ कानेटकर, नरहर गणेश
६ काळे, शिवराम गणेश
७ नवाथे, विश्वनाथ बळवंत
८ साने, मुकुंद विनायक
९ आठवले, रामचंद्र बळवंत
१० दातार, सदाशिव नारायण
११ जोशी, गोविंद लक्ष्मण
१२ खरे, शंकर अमृत
१३ हर्डीकर, विश्वनाथ केशव
१४ मनोहर, विश्वनाथ रघुनाथ

### इंदूर

१ वाड, यशवंत दत्तात्रेय
२ कुलकर्णी, यशवंत खंडेराव
३ कालेवार, केशवराव विठ्ठलराव
४ गोळे, विश्वनाथ गोपाळ
५ खरे, गोविंद आत्माराम
६ मोडक, भास्कर लक्ष्मण
७ पाटकर, शांताराम कृष्ण
८ गंधे, सदाशिव कृष्ण
९ रेगे, मेघश्याम भगवंतराव

अनुक्रमणिका

१० जोशी, दत्तात्रेय गोपाळ
११ भांडारकर, (कु.) अहिल्या
१२ गोसावी, श्रीनिवास दत्तात्रेय
१३ जुवेकर, दत्तात्रेय कृष्ण

रतलाम

१ म्हात्रे, रामकृष्ण हिरामण
२ नाडकर्णी, मारुति मंगेशराव
३ घाटे, विष्णु सखाराम

देवास

१ गंधे, सौ. कुंदराणी

उज्जयिनी

१ वैद्य, रघुनाथ विनायक
२ आष्टेवाले, धुंडिराज कृष्ण
३ लेले, वासुदेव व्यंकटेश
४ सहस्रबुद्धे, केशव सावळाराम
५ माचवे, प्रभाकर बळवंत
६ वैद्य, शंकर रामचंद्र
७ खांडेकर, कु. अनसूया शंकर
८ दिवेकर, हरि रामचंद्र

गोवें

१ डांगी, महाबळेश्वर सी, म्हापसें

पुणें

१ देवघर, चिंतामण रामचंद्र
२ पटवर्धन, जी. अेन्.
३ लोणकर, य. वि.
४ कर्वे, धों. के.
५ तुळपुळे, ह. वि.

घाकातोल (नेपाळ)

१ राजगुरु, हेमराजपंडित

---

## यशस्वी उमेदवारांचीं नांवें

### प्राज्ञ परीक्षा

#### २ री कक्षा (गुणानुक्रमें)

(१) सोमण, र. वि., मुंबई, (२) शेणोलीकर, ह. श्री., पुणें व (३) मुळ्ये, दा. गो., मुंबई.

#### २ री कक्षा ( वर्णानुक्रमें )

(१) उपासनी, म. रा., इंदूर, (२) किरकिरे, निर्मला गो., नागपूर, (३) कुळकर्णी, मु. मो., पुणें, (४) गोस्वामी, ग. व., पुणें, (५) गोहाड, रा. वि., पुणें, (६) निमकर, वि. रा., पुणें, (७) बापट, म. मो., पुणें, (८) वेहेरे, मा. कृ., पुणें, (९) मुळे, गो. कृ., इंदूर, (१०) मोने, वा. का., मुंबई, (११) शहाणे, लीला ज्ञानेश्वर, नागपूर, (१२) साठे, बा. ल., मुंबई, व (१३) सासवडकर, प्र. ल., पुणें.

### विशारद परीक्षा

#### ३ री कक्षा

मुळे, गोविंद कृष्ण, इंदूर.

# २१ व्या (जळगांव) महाराष्ट्र साहित्य संमेलन ठरावांच्या अंमलबजावणीचा वृत्तांत

(जुजवी स्वरूपाच्या व शिफारसवजा ठरावांचा या वृत्तांतांत उल्लेख केलेला नाही.)

**ठराव ४**— (आक्षिप्त भाग गाळून जप्त पुस्तकें पुनर्मुद्रित करण्यास सरकार परवानगी देत नाही याजविषयी). शिष्टमंडळाचे प्रयत्न बऱ्याच अंशीं यशस्वी झाले असून जप्त पुस्तकांवरील बंदी उठत आहे.

**ठराव ६**— महाराष्ट्र विद्यापीठस्थापनेच्या कार्याला जास्त जोराने चालना मिळण्यास झटून प्रयत्न करावा अशी विनंती या ठरावांत केली आहे. ठरावाच्या प्रती महाराष्ट्र युनिव्हर्सिटी असोसिअेशनचे प्रचालक, उच्च शिक्षणसंस्था व कौन्सिलांतील निरनिराळ्या पक्षांचे पुढारी यांजकडे पाठविण्यांत आल्या. कॉंग्रेसपक्षाचे पुढारी व पंतप्रधान यांजकडून पोंच आली असून यासंबंधी विचार होत आहे असें लिहून आलें आहे.

**ठराव ९**— या ठरावाच्या प्रती पाठवून पाठशाळांतून मराठी व्याकरण शिकविण्याच्या कामीं होत असलेला हलगर्जीपणा मुंबई व मध्यप्रांत विद्याधिकारी आणि साऱ्या नगरपालिका व जिल्हा स्कूल बोर्डांचे अधिकारी यांच्या निदर्शनाला आणला. मुंबई विद्याधिकाऱ्यांची पोंच आली असून जळगांव व अलिबाग येथील अधिकाऱ्यांनी आपल्या शाळांतून असला हलगर्जीपणा होत नाही असें कळविलें आहे.

**ठराव १०**— अभ्यासक्रम व पाठ्यपुस्तकें यांची पाहणी करून त्याविषयीच्या विधायक सूचना अंमलांत आणण्यास एक स्थायी समिति नेमावी असा हा ठराव आहे. परिषदेच्या परीक्षांस नुकताच आरंभ झाल्यामुळे व या कार्यास बराच खर्च येणार असल्यामुळे या ठरावाची अंमलबजावणी लांबणीवर टाकण्यांत आली आहे.

**ठराव १२**— भूगोल, भौतिकशास्त्र व गणित या विषयांचीं उत्तरें जन्मभाषेंतून देऊन मॅट्रिक्युलेशन परीक्षा उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्यांना कॉलेजमधील परीक्षांमध्येहि हीच सवलत देण्यांत यावी अशी विनंती या ठरावाच्या रूपाने मुंबअी विद्यापीठास केली होती. सदरहू ठरावाची प्रत दप्तरीं नमूद केली आहे असें त्या विद्यापीठाकडून लिहून आलें आहे.

**ठराव १३**— देशी वाङ्मयामध्ये अमोलिक भर टाकणाऱ्या विद्वान साहित्यिकांचा सन्मान करण्याच्या आवश्यकतेचा हा ठराव १५ विद्यापीठांकडे पाठविण्यांत आला; पैकी मात्र मुंबई व पंजाब यांजकडून पोंच आली आहे.

**ठराव १४**— प्राथमिक शिक्षक तयार करणाऱ्या ट्रेनिंग कॉलेज संस्थांतून पूर्वीप्रमाणे संस्कृत हा विषय शिक्षणक्रमांत दाखल करावा अशी विनंती या ठरावान्वयें मुंबई व नागपूर येथील विद्याधिकाऱ्यांस केली होती. या प्रश्नाचा विचार होत आहे असें मुंबई विद्याधिकाऱ्यांकडून लिहून आलें आहे.

(म. सा. प. ११-२-७)

**ठराव १६**— मुंबई मराठी साहित्यसंघ आदिकरून संस्थांनी नियुक्त केलेल्या शिष्ट-मंडळातर्फे प्रेस ॲक्ट रद्द करण्यासंबंधीं प्रयत्न चालू आहेत व परिषदेनेहि या कार्यांत भाग घेतला आहे. नागपूरासहि असाच प्रयत्न चालू आहे.

**ठराव १७**— गेल्या लोकगणतीच्या वेळीं निजाम संस्थानांतील मराठवाड्यांत मराठी-भाषिकांच्या संख्येंत घट झाल्यामुळे तेथील प्रत्यक्ष परिस्थितीची चौकशी परिषदेने करावी अशा अर्थाचा हा ठराव आहे. त्याप्रमाणे हैद्राबादच्या प्रजापक्षीय मुख्य राजकीय संस्थेच्या चिटणी-सांस परिस्थितीची माहिती पाठविण्यास विनंती करण्यांत आली व मागाहून स्मरणपत्रहि पाठ-विलें, परंतु अद्याप त्यांजकडून कांहीच लिहून आलें नाही.

---

# महाराष्ट्र साहित्य परिषद्

## १९३७ (एप्रील ते डिसेंबर)चें इतिवृत्त

नवीन घटनेप्रमाणे वर्षारंभ एप्रील ऐवजी जानेवारीपासून धरावा लागल्यामुळे या इतिवृत्तांत एप्रील ते डिसेंबर १९३७ या नऊ महिन्यांचाच समावेश झाला आहे.

**सभासद**— या नऊ महिन्यांत ५ तहह्यात व १८८ साधारण असे १९३ नवीन सभासद परिषदेस लाभले. दोन साधारण सभासद गळले व १ साधारण सभासद तहह्यात सभासद झाले. वर्षअखेरीस पटावर असलेले सभासद येणेप्रमाणेः—उपकर्ते १, आश्रयदाते १, हितचिंतक ४, तहह्यात ९४, व साधारण ५१८; अेकूण ६१८. यांखेरीज तहह्यात सभासदांसाठी १७ अर्जे दप्तरीं असून वर्गणीची वसुली हप्त्याने होत आहे. या वर्षी १ संस्था संलग्न करून घेण्यांत आली. वर्षअखेरीस एकूण २१ संलग्न संस्था पटावर आहेत.

**आर्थिक परिस्थिति**— वर्षारंभीं असलेल्या कर्जापैकी रु. ७४७ चुकते होऊन व अंदाजपत्रकांत समाविष्ट न झालेला अनपेक्षित खर्च रु. ५८ जाऊन वर्षाच्या शेवटीं शिल्लक रु. ६५४ राहिली आहे. याखेरीज इमारतनिधीकडे रु. ४५८ उसनवारीने दिले आहेत. ते लवकरच परत मिळतील. आता देणें रुपये २५० राहिलें आहे. त्याची फेड शिलकेंतून अथवा इमारतनिधीची उसनवारी परत आल्यावर होईल. याप्रमाणे सारें कर्ज जाऊन वर्षअखेरीस खरी शिल्लक रुपये ८६२ आहे असें दिसून येईल.

**देणग्या**— श्रीमती रमाबाईसाहेब आपटे यांनी कै. हरिभाऊ आपटे यांच्या स्मरणार्थ इमारतीसाठी रु. ५०० ची देणगी दिली आहे व आणखी रु. ५०० देण्याचेंहि आश्वासन दिलें आहे. (देणगीची ही उरलेली रक्कम आता आली आहे). मुंबईचे डॉ. म्हसकर यांनी इमारतनिधीस रु. ५०० ची देणगी दिली. इमारतीसाठी इतर देणग्या आल्या त्या येणेंप्रमाणे— केसरी मराठा संस्था रु. १०१; श्री. वि. द. घाटे, मुंबई, २००; श्री. पु. ग. नानल, पुणें, ४१; श्री. रा. के. वाळ, पुणें, ४०; श्री. कों. म. कुमठेकर, पुणें, रु.५०; श्री. मो. भ. प्रधान रु. ६.

इचलकरंजी संस्थानचे अधिपति श्रीमंत बाबासाहेब घोरपडे यांनी दोन हजार रुपये दर्शनी किमतीचे ३॥ टक्के दराचे सरकारी कर्जरोखे परिषदेस सालोसाल व्याज मिळावें या उद्देशाने त्यांनी नेमलेल्या ट्रस्टींच्या नांवें करून दिले आहेत, याबद्दल परिषद् त्यांची सदैव ऋणी राहील.

प्रि. घ. रा. गाडगीळ यांनी १९३६-३७ सालीं झालेला लाकडी सामान व सतरंज्या यांचा खर्च भागविण्यास रु. ११३–१५–६ ची देणगी दिली.

जळगांव संमेलनाच्या स्वागतमंडळाने परिषदेस १०१ ची देणगी दिली.

या सर्व देणग्यांबद्दल परिषद् कृतज्ञ आहे.

**इमारत**—इमारतीबद्दल एकंदर खर्च रु. ७२२८–५–० झाला आहे. हा खर्च भागविण्यास परिषदेच्या चालू उत्पन्नांतून रु. ४५८–१३–० उसनवारीने घ्यावे लागले. आश्वासित देणग्यांची रक्कम सुमारें रु. ९०० असून त्यांपैकी बऱ्याचशा देणग्या लवकर मिळतील

अनुक्रमणिका

अशी अपेक्षा आहे. या इमारतीमुळे कचेरीच्या कामाची सोय झाली आहे, परंतु सभा-समारंभ भरविणें वगैरे योजिलेल्या कार्यासाठी ती अत्यंत अपुरी आहे याची जाणीव पदोपदीं होत आहे.

**सभा**— इतिवृत्तवर्षी नियामक मंडळाची एक व कार्यकारी मंडळाच्या आठ सभा झाल्या.

**उपसमित्या**— व्याकरणपरिषदेने नेमलेल्या समितीच्या सभा महिन्यांतून बहुतेक दोनदा भरविण्यांत आल्या व या समितींचें काम सारखें चालू आहे. असल्या समितींचें दृश्य लवकर दिसून येत नाही, परंतु समितींतील सभासदांचा वारंवार विचारविनिमय होऊन कालांतराने दृश्य फल दिसूं शकेल. परीक्षासमितीने परिश्रमाने पूर्वतयारी करून परिषदेने योजिलेल्या परीक्षा अस्तित्वांत आणण्याची व्यवस्था केली आहे. प्राज्ञ व विशारद या परीक्षा ता. १७ जानेवारी १९३८ पासून प्रथमच घेण्यांत येतील. या परीक्षांसाठी अनुक्रमें ३८ व ३ उमेदवारांचे अर्ज आले आहेत.

**शाखासभा**— नवीन घटनेप्रमाणें पहिल्या शाखासभेची स्थापना मध्यप्रांतांत झाली. या शाखासभेने थोड्याच अवकाशांत प्रांतिक संमेलन भरवून तें यशस्वी रीत्या पार पाडलें हें या शाखासभेस भूषणावह आहे. इतर प्रादेशिक विभागांत शाखासभा उघडण्याची पूर्व-तयारी झाली असून लवकरच ६।७ शाखासभांची स्थापना होईल अशी अपेक्षा आहे.

**इतर**—'आक्षित' म्हणून मानल्या गेलेल्या वाङ्मयावरील निर्बंध काढून टाकण्यांत यावेत यासंबंधी साहित्यसंमेलनांमध्ये मागे वारंवार ठराव मान्य करण्यांत आले. ते सरकारांत पाठ-विण्यांत येत होते व तत्संबंधी पत्रव्यवहारहि करण्यांत येत होता. परंतु त्याचा फारसा उपयोग झाला नाही. या बाबतींत एखादें प्रतिनिधिमंडळ मंत्रिमंडळाकडे पाठविण्यांत यावें असा परिषदेच्या चालकांचा विचार चालू होता. परंतु मुंबईच्या मराठी साहित्यसंघादि चार संस्थांनी कार्यक्षमता दाखवून प्रतिनिधिमंडळाची एक योजना निश्चित केली, व या प्रतिनिधिमंडळांत साहित्यपरिषदेचे दोन प्रतिनिधि (अध्यक्ष श्री. न. चिं. केळकर व कार्याध्यक्ष प्रो. वा. म. जोशी) समाविष्ट होते. या प्रतिनिधिमंडळाचें नेतृत्व सुप्रसिद्ध मजूरपुढारी ना. म. जोशी, एम्. एल. ए., यांचेकडे होतें व त्यांत (१) प्रो. मा. दा. आळतेकर, (२) श्री. द. आ. तुळजापूरकर, (३) श्री. श्री. म. वर्दे, (४) श्री. लालजी पेंडसे, व (५) डॉ. अ. ना. भालेराव हे सभासद होते. या मंडळाने पंतप्रधान ना. बाळासाहेब खेर यांची मुलाखत घेऊन आपलें म्हणणें त्यांच्यापुढे मांडलें. पंतप्रधानांनी तें सर्व ऐकून घेऊन त्यावर थोडीबहुत चर्चा केली व या प्रश्नाचा पूर्ण सहानुभूतीने विचार करण्याचें आश्वासन दिलें, आणि त्याप्रमाणे कांही पुस्तकांवरील निर्बंध काढून टाकण्याचें सरकारकडून तदनंतर प्रसिद्धहि करण्यांत आलें. कांही पुस्तकांवरील निर्बंध तदनंतरहि निघाले आहेत; परंतु अद्यापि पुष्कळच कार्य करावयाचें राहिलें आहे. या प्रश्नाच्या बाबतींत सरकारची सहानुभूति आहे हें पाहून आनंद होतो; परंतु हें काम अधिक तांतडीचें असल्याने अधिक व्यापक रीतीने होणें इष्ट आहे.

वरील वृत्तान्तावरून परिषदेची प्रगति होत आहे असें दिसून येईल, परन्तु या प्रगतीने परिषदेच्या चालकांचें किंवा सभासदांचेंहि पूर्ण समाधान होत आहे असें नाही. परि-षदेचें कार्य अधिक व्यापक होऊन तिची उपयुक्तता वाटावी या दृष्टीने कोणी सूचना केल्यास त्यांचा आनंदाने विचार केला जाईल. परिषदेबद्दल सहानुभूति दिवसेंदिवस वृद्धिंगत होत आहे व संस्थांचें सहकार्यहि अधिकाधिक होत आहे ही आनंदाची गोष्ट आहे.

---

# महाराष्ट्र साहित्य परिषद्

## जमा (एप्रिल-डिसेंबर, १९३७).

| जमा | | खर्च | |
|---|---|---|---|
| ५६३१–१२–२ | शिल्लक मागील साल-अखेर | टपाल– | १६०–१२–० |
| | | पत्रिका १०३-१५-३ | |
| | | कचेरी ५६-१२-९ | |
| १२३१—५–० | साधारण सभासद वर्गणी | किरकोळ | ४०–१२–३ |
| ५५–१४–० | संलग्न संस्था ,, | जागाभाडें | १५—०–० |
| ८६—८–० | पत्रिका ,, | प्रवास-प्रचार | ९०–१३–० |
| ३६३—८–० | तहह्यात सभासद ,, | पगार | ३५५—८–६ |
| १७६—४–९ | ग्रंथविक्री | व्याकरणपरिषद् | ८—०–० |
| १४३७—०–० | इमारतनिधि देणगी | सादिल | ९–१५–९ |
| ६०६—४–५ | व्याज { ट्रस्टी ६०० ; ख.दार ६-४-५ } | लिखाई | ०–१०–० |
| ११३–१५–६ | विशेष देणगी (सामाना-करिता) | वीज | १२–१३–० |
| | | कचेरीभाडें | १०—०–० |
| २—७–३ | किरकोळ जमा | छपाई– | ५५८–११–६ |
| १०१—०–० | जळगांव संमेलन देणगी | पत्रिका ५३२-३-६ | |
| २१५—०–० | परीक्षाशुल्क | कचेरी २६-८-० | |
| १००२०–१५–१ | एकूण | निवडणूक | २२—३–६ |
| | | म्युनिसिपल कर | २७–११–० |
| | | परीक्षाखर्च | ६–१२–० |
| | | बट्टा | १–१०–० |
| | | पुस्तकछपाई व बांधणी | ३०—४–० |
| | | नागपूर शाखासभा | ३९—०–० |
| | | एकूण | १३९०—८–६ |
| | | शिल्लक-पुढील सालाकरिता | ८६३०—६–७ |
| | | एकूण तोंडमिळवणीची बेरीज | १००२०–१५–१ |

तपासलें. बरोबर आहे.

(सही) द. दा. देशपांडे,
हिशेबतपासनीस,
२५।२।३८.



अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य परिषद्



## जमाखर्चाचा आढावा (एप्रिल-डिसेंबर १९३७).

| देणें | | येणें | |
|---|---|---|---|
| ८६३०-६-७ | शिल्लक | १७२-११-९ | शिल्लकी सामान |
| २५०-०-० | अनामत [श्री. करमरकर इंजीनिअर] | ८१५- ७-३ | ट्रस्टी (तह. वर्गणी) |
| | | ७२२८- ५-० | इमारत |
| | | ७- ४-० | अनामत (तांबे गौरव ग्रंथाचे पार्सल सोडविण्यासाठी दिलेली रक्कम. |
| | | १-१४-० | ग्रंथ |
| | | ५९९- ५-० | खजिनदार (बँकेंत) |
| | | ५-१५-४ | चिटणीस (बँकेंत) |
| | | ४९- ८-३ | रोख शिल्लक (पो.तिकिटांसह) |
| ८८८०- ६-७ | एकूण | ८८८०- ६-७ | एकूण |

इ. स. १९३७ मधील एप्रिल ते डिसेंबर १९३७ पर्यंतचे हिशोब तपासले. हिशोब चांगल्या पद्धतीने ठेविले गेले आहेत. मला पाहिजे असलेली सर्व माहिती मिळाली. मला दाखविण्यांत आलेल्या जमाखर्चाच्या वह्यांप्रमाणे व व्हाउचर्सप्रमाणे हिशोब बरोबर आहेत. गेल्या दोन तीन वर्षे करण्यांत येत असलेली सूचना यंदा चिटणिसांनी अंमलांत आणून, कॅश-बुक दर आठवड्यास तपासून, शिलकीबाबत सह्या केल्या आहेत. सदरहू पद्धत अशीच चालू ठेवण्यांत यावी. करंट खातें उघडून थोडें का होईना, व्याजाचें नुकसान होऊं नये म्हणून करण्यांत येत असलेली सूचना व ट्रस्टींकडील हिशोब ह्याच हिशोबाबरोबर प्रसिद्ध व्हावेत म्हणून केलेली सूचना अंमलांत आणण्यांत आल्या नाहीत.

(सही) द. दा. देशपांडे, बी. ए., एफ्.सी.आर.ए.,
कॉरपोरेटेड अकौंटंट.

२५।१।३८.

(अंदाजपत्रक)

| उत्पन्न | | खर्च | | | | गेल्या पांच वर्षांतील खर्चाची वार्षिक सरासरी |
|---|---|---|---|---|---|---|
| ६५४-१२—७ | शिल्लक | २५० | देणें (अनामत) | | | |
| ४५८-१३—० | येणें (इमारतफंडातून) | ८५० | कचेरी खर्च | | | ७६६ |
| ६००—०—० | व्याज (ट्रस्टींकडून) | | | पगार | ५४० | ४२५ (४ वर्षांची सरासरी) |
| ११३३—०—० | साधारण सभासद वर्गणी | | | जागाभाडें | १६ | |
| १००—०—० | पत्रिकावर्गणी | | | म्युनि. कर | २६ | २३४ |
| ४०—०—० | संलग्न संस्था वर्गणी | | | वीज | १५ | |
| १००—०—० | ग्रंथविक्री | | | टपाल | १०० | ८५ |
| २००—०—० | परीक्षाशुल्क | | | लिखाई | १३ | २२ |
| ३—६—५ | किरकोळ | | | किरकोळ खर्च | १०० | १०९ |
| | | | | सादील | ४० | २६ |
| ३२९०—०—० | एकूण | | | | ८५० | |
| | | ११३० | पत्रिकाखर्च | | | |
| | | | | छपाई | ८७० | |
| | | | | टपाल | २५० | ११८५ |
| | | | | किरकोळ | १० | |
| | | | | | ११३० | |
| | | ५० | संमेलनखर्च | | | ६१ |
| | | ३०० | शाखासभांस द्यावयाची रक्कम | | | |
| | | १५० | प्रवास-प्रचार | | | |
| | | २०० | परिषद् इतिहास | | | |
| | | ५० | उपसमित्या व संपादकमंडळ | | | |
| | | २०० | परीक्षाविषयक खर्च | | | |
| | | ५० | शिलकी सामान | | | |
| | | ६० | किरकोळ खर्च | | | ५६ (३ वर्षांची सरासरी) |
| | | ३२९० | एकूण | | | |

## अंदाजपत्रकाशीं जमाखर्चाचा पडताळा

| जमा | | | | खर्च | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | अंदाजपत्रकाप्रमाणे | प्रत्यक्ष | तफावत | | अंदाजपत्रकाप्रमाणें | प्रत्यक्ष | तफावत |
| साधा. सभासद वर्गणी | ६०० | ५७३ | – २७ | कचेरीखर्च | ५४७ | ५१५ | – ३२ |
| नवीन ,, ,, | ५६५ | ६५८ | + ९३ | पत्रिकाखर्च | ६४० | ६३६ | – ४ |
| पत्रिका वर्गणी | ५० | ८६ | + ३६ | प्रवास-प्रचार | ५० | ९१ | + ४१ |
| संलग्न संस्था वर्गणी | २५ | ५५ | + ३० | निवडणुकीच्या खर्चाचा भाग | २५ | २२ | – ३ |
| ग्रंथविक्री | २५ | १७६ | +१५१ | परिषद् इतिहास | २०० | ० | –२०० |
| किरकोळ | ८ | २ | – ६ | उपसमित्या व संपादकमंडळ | ७५ | ७ | – ६८ |
| | | | | पुस्तकछपाई व पुस्तकबांधणी | ० | ३० | + ३० |
| | | | | व्याकरण परिषद् | ० | ८ | + ८ |
| | | | | मध्यप्रांत शाखासभा | ० | ३९ | + ३९ |
| | | | | शिलकी सामान | ४५ | ४५ | ० |
| | | | | किरकोळ | ४५ | ४० | – ५ |

# महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या परीक्षा

मराठी भाषेचा अभ्यास वाढावा या दृष्टीने म. सा. परिषदेने प्रतिवर्षी तीन परीक्षा घेण्याची योजना केली आहे. पहिल्या परीक्षेस प्राज्ञ, दुसरीस विशारद व तिसरीस आचार्य. अशा पदव्या देण्यांत येतील. या परीक्षा प्रतिवर्षी नोव्हेंबर महिन्यांत घेतल्या जातील. १९३८ व १९३९ या वर्षी फक्त पहिल्या दोन परीक्षाच घेण्यांत येतील. पहिली आचार्य परीक्षा १९४० साली घेण्यांत येईल.

## १९३८ च्या परीक्षांचा तारीखवार कार्यक्रम

### प्राज्ञ परीक्षा

| | | | | |
|---|---|---|---|---|
| शुक्रवार ता. १८ नोव्हेंबर १९३८... | १० ते १ | गद्य............ | प्रश्नपत्रिका | १ |
| ,, ,, ,, | २ ते ५ | पद्य............ | ,, | २ |
| शनिवार ता. १९ नोव्हेंबर १९३८... | १० ते १ | भाषा, व्याकरण, निबंध | ,, | ३ |

### विशारद परीक्षा

| | | | | |
|---|---|---|---|---|
| सोमवार ता. २१ नोव्हेंबर १९३८... | १० ते १ | गद्य............ | प्रश्नपत्रिका | १ |
| ,, ,, | २ ते ५ | गद्य............ | ,, | २ |
| मंगळवार ता. २२ नोव्हेंबर १९३८... | १० ते १ | पद्य............ | ,, | ३ |
| ,, ,, | २ ते ५ | भाषा-साहित्य...... | ,, | ४ |
| बुधवार ता. २३ नोव्हेंबर १९३८... | १० ते १ | निबंधलेखन...... | ,, | ५ |

केंद्रें — पुणें, मुंबई व नागपूर. पुरेसे उमेदवार मिळाल्यास अमरावती, कोल्हापूर, नाशीक, नगर, जळगांव, धुळें, इंदूर, बडोदें, औरंगाबाद किंवा हैद्राबाद (दक्षिण) या शहरींहि केंद्रें ठेवण्यांत येतील. मात्र किमान ५ विद्यार्थी असल्याशिवाय परीक्षेचें केंद्र उघडलें जाणार नाही.

शुल्क — प्राज्ञपरीक्षा–रुपये पांच; विशारदपरीक्षा–रुपये दहा; आचार्यपरीक्षा–रुपये पंचवीस. उमेदवारांनी पाठवावयाच्या अर्जाचा तक्ता परिषदेच्या कार्यालयांतून मागवून घ्यावा. तक्ता व शुल्क (म.ऑ.ने) ही ३० सप्टेंबर १९३८ पूर्वी कार्यालयांत (टिळक रस्ता, पुणें नं.२) पोहोंचेल अशा बेताने पाठवावीं. या तारखेनंतर आलेल्या अर्जांचा विचार करण्यांत येणार नाही.

शुल्काची रकम कोणत्याहि कारणास्तव परत केली जाणार नाही. मात्र एखादा उमेदवार आजारामुळे किंवा अन्य महत्त्वाच्या अडचणीमुळे परीक्षेस बसूं शकला नाही, व त्याने दाखविलेलें कारण म. सा. परिषदेच्या कार्यकारी मंडळास सयुक्तिक वाटलें तर त्याने भरलेल्या शुल्काची २/३ रकम पुढील परीक्षेसाठी त्याच्या नांवाने राखून ठेवण्यांत येईल. बाकीची १/३ रकम त्याला पुढल्या वर्षी परीक्षेच्या अर्जाबरोबर भरावी लागेल.

कोणत्याहि उमेदवारास तशी इच्छा असल्यास प्राज्ञ व विशारद या दोन्ही परीक्षांस अेकाच वर्षी बसतां येईल. मात्र प्राज्ञ परीक्षेस बसल्याशिवाय कोणालाहि विशारद या परीक्षेस

बसूं दिलें जाणार नाही. ज्यांना दोन्ही परीक्षांस बसावयाचें नसेल त्यांना केवळ प्राज्ञ परीक्षेस बसतां येईल. विशारद परीक्षा उत्तीर्ण झाल्याशिवाय कोणालाहि आचार्य परीक्षेस बसतां येणार नाही.

## परीक्षांसंबंधी अटी व इतर माहिती

उमेदवारांनी वार्षिक साडेतीन रुपये वर्गणी भरून परिषदेचे सभासद व्हावें हें बरें. म्हणजे त्यांना साहित्यपत्रिकेचे अंक नियमाने मोफत मिळतील व संस्थेशीं त्यांचा निकट संबंध राहील. कारण साहित्यपत्रिका ही परिषदेचें मुखपत्र असल्यामुळे परीक्षांसंबंधी माहिती त्यांत प्रसिद्ध होते.

(१) प्राज्ञ परीक्षेचा दर्जा सामान्यतः अिंटरबरोबर असेल. विशारद परीक्षा ही मुंबअी विश्वविद्यालयाच्या बी. अे. (ऑनर्स) च्या बरोबरीची राहील. आचार्य परीक्षेचा दर्जा मात्र अेम्. अे. च्या बरोबरीचा किंबहुना थोडा वरचढच राहील. अर्थात् ही तुलना फक्त मराठी या भाषाविषयापुरतीच आहे. कारण विश्वविद्यालयाच्या परीक्षांना मराठी खेरीज अितर अनेक विषय अभ्यासाकरिता आवश्यक असतात.

(२) प्रश्नपत्रिका विश्वविद्यालयीन परीक्षांच्या प्रश्नपत्रिकांच्या नमुन्याप्रमाणे परंतु मराठींत काढल्या जातील. अभ्यासविषयक ग्रंथांबरोबर त्या त्या ग्रंथकारांची थोडीबहुत चरित्रविषयक माहिती, त्यांच्या लेखनाचें वैशिष्ट्य, त्यांची लेखनशैली, भाषापद्धति वगैरे अनुषंगिक माहिती उमेदवारांना असली पाहिजे अशी परीक्षकांची अपेक्षा राहील. अितकी तयारी करूनच परीक्षांस बसावें. सर्व प्रश्नपत्रिकांचीं उत्तरें अर्थातच मराठींतूनच लिहिलीं पाहिजेत; बाळबोध लिपी वापरावी. निबंधाची प्रश्नपत्रिका मोडी लिपींत लिहिली तरी चालेल.

(३) अेकंदर परीक्षेंत शेकडा पसतीस गुण व प्रत्येक प्रश्नपत्रिकेंत किमानपक्ष शेकडा पंचवीस गुण मिळविणारा विद्यार्थी परीक्षेंत तिसऱ्या कक्षेंत उत्तीर्ण झाला असें समजलें जाअील. अेकंदर सर्व प्रश्नपत्रिका मिळून शेकडा पन्नास गुण मिळवणारा विद्यार्थी दुसऱ्या कक्षेंत व शेकडा पांसष्ट गुण मिळवणारा विद्यार्थी पहिल्या कक्षेंत उत्तीर्ण झाला असें जाहीर करण्यांत येईल.

(४) परीक्षांचा निकाल परीक्षा संपल्यानंतर सहा सात आठवड्यांच्या आंत वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध केला जाईल. परीक्षांचा निकाल जाहीर झाल्यानंतर एक महिन्याच्या आंत प्रश्नपत्रिकांच्या फेरतपासणीसाठी उमेदवाराने अर्ज केल्यास तपासणी करून निकाल उमेदवारास कळविला जाईल. प्राज्ञपरीक्षेच्या उमेदवारास ३ रुपये व विशारदपरीक्षेच्या उमेदवारास ५ रुपये फेरतपासणीसाठी जादा शुल्क द्यावें लागेल.

(५) निरनिराळ्या परीक्षांत उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्यांना योग्य तीं प्रशस्तिपत्रें देण्यांत येतील.

(६) परीक्षांना कोणीहि स्त्री, पुरुष बसूं शकेल. वय, विद्यालयांतील वा शाळेंतील पूर्वशिक्षण, नोकरी वगैरे कोणत्याहि अटी नाहीत. विशारद परीक्षा उत्तीर्ण झाल्याशिवाय आचार्य या परीक्षेला बसतां येणार नाही. प्राज्ञ व विशारद या परीक्षांना अिच्छा असल्यास अेकाच वर्षी बसतां येईल. प्राज्ञ परीक्षा पास झाल्याशिवाय मात्र विशारद ही पदवी मिळणार नाही.

(७) पुस्तकें साहित्यपरिषदेच्या कचेरींतून उसनवार किंवा विकत दिलीं जात नाहीत. पुण्या-मुंबअीच्या कोणत्याहि पुस्तकविक्रेत्याकडून आपल्या जबाबदारीवर विद्यार्थ्यांनी तीं मागवावीं.

(८) परीक्षेचा अभ्यास प्रत्येकाला आपल्या जबाबदारीवर करावा लागेल. परिषदेमार्फत

वर्ग चालविले जात नाहीत किंवा अभ्यासूंना पत्रद्वारें शिक्षण दिलें जात नाही. संस्थांनी किंवा व्यक्तींनी खासगी वर्ग चालविले तर परिषदेस आनंद होईल.

(९) साहित्यपरिषदेने मान्य केलेले शुद्धलेखनाचे नियम परीक्षेस प्रमाणभूत धरिले जातील. शुद्ध-लेखन-नियमांची छोटीं पुस्तकें अडीच आण्यांचीं पोस्टाचीं तिकिटें पाठवून परिषदेच्या कचेरींतून विकत मिळतील. अभ्यासक्रम, नियम व नमुनेदार प्रश्नपत्रिका दिलेलें परीक्षा-पुस्तक तीन आण्यांचीं तिकिटें पाठविणारास परिषदेच्या कचेरींतून मिळेल.

(१०) परीक्षांचा व्यावहारिक उपयोग विद्यार्थ्यांच्या वैयक्तिक कर्तबगारीवर व महाराष्ट्र-साहित्यपरिषद् या संस्थेच्या सन्मान्यतेवर अवलंबून राहील. विश्वविद्यालयाच्या परीक्षांना देखील हाच नियम लागू पडेल. ज्ञान व व्यवहार यांचा मेळ नित्य बसतोच असें नाही; परंतु त्यामुळे ज्ञानाची उपासना थोडीच थांबणार !

म. सा. परिषद् कार्यालय,
टिळक रस्ता, पुणें २.
१४ मार्च १९३८.

ना. के. बेहेरे
र. लु. जोशी
चिटणीस,
महाराष्ट्र साहित्य परिषद्.

---

## साहित्यविषयक परीक्षांचा अभ्यासक्रम

१९३८ व १९३९ या वर्षी होणाऱ्या परीक्षांचा अभ्यासक्रम खाली दिला आहे. १९४० पासून अभ्यासक्रम बदलेल. अभ्यासक्रम परीक्षेच्या सामान्यतः अेक वर्ष अगोदर प्रसिद्ध केला जाअील. सर्वच पुस्तकें अेकदम बदलतील असें नाही. कांही बदलतील तर कांही पूर्वीचींच राहतील.

### प्राज्ञ परीक्षा

दर्जा—मॅट्रिक व थर्ड अियर (ट्रेनिंग)च्या बराच वरचा. प्रत्येक पत्रिकेला १०० गुण ठेविले आहेत.

एकंदर तीन प्रश्नपत्रिका

**प्रश्नपत्रिका १ ली (गद्य)**

१ यशवंतराव खरे (ह. ना. आपटे)
२ विष्णुशास्त्री चिपळूणकर चरित्र (लक्ष्मणराव चिपळूणकरकृत)
३ इतिहासमंजिरी (द. वि. आपटे)
४ विचारविलास (वा. म. जोशी)
किंवा
गद्यगुच्छ (न. चिं. केळकर)

**प्रश्नपत्रिका २ री (पद्य)**

१ नवनीत—खालील निवडक वेंचेः—
अेकनाथ—अंगदशिष्टाअी
तुकाराम—शिवाजीराजास पत्र
वामन—नृसिंहावतार
रामदास—मनाचे श्लोक
मुक्तेश्वर—नारदनीति
श्रीधर—अभिमन्युवध
महिपति—अेकनाथचरित्र
मोरोपंत—नलोपाख्यान, संशयरत्नमाला
२ रसवंती (भाग २) रानडे-खानोलकर

**प्रश्नपत्रिका ३ री (भाषा, व्याकरण व निबंध)**

१ व्याकरण (ना.वि.आपटे), २ वृत्तदर्पण (गोडबोले), ३ सुलभ अलंकार (रा.भि.जोशी) ४ मराठीची सजावट भाग १ व २ (मुजूमदार)

**विशारद परीक्षा**

दर्जा—बी. ए. (ऑनर्स). प्रत्येक पत्रिकेला १०० गुण.

**एकंदर पांच प्रश्नपत्रिका**

**प्रश्नपत्रिका १ ली (गद्य)**

१ सुशिलेचा देव (वा. म. जोशी)
२ दौलत (ना. सी. फडके)
३ सौभद्र (किर्लोस्कर)
४ भाऊबंदकी (कृ. प्र. खाडिलकर)
५ प्रेमसंन्यास (गडकरी)
६ जागती ज्योत किंवा सत्तेचें गुलाम (भा. वि. वरेरकर)

**प्रश्नपत्रिका २ री (गद्य)**

१ टिळकचरित्र भाग १ ला (न. चिं. केळकर)
२ अच्युतराव कोल्हटकरांचे लेख-भाग १ ला
३ भाऊसाहेब पेशव्यांची बखर
४ वासुदेवराव खरे यांच्या प्रस्तावना
५ सुदाम्याचे पोहे (श्री. कृ. कोल्हटकर)

**प्रश्नपत्रिका ३ री (पद्य)**

१ मोरोपंत (कर्णपर्व)
२ ज्ञानेश्वरी (१८ वा अध्याय)
३ तुकाराम (महाराष्ट्र वेद-टिपणीसकृत)
४ केशवसुतांची कविता (प. चिं. दामले)
५ तांबे यांची कविता (मा. त्रिं. पटवर्धन)

**प्रश्नपत्रिका ४ थी (भाषा-साहित्य)**

१ व्याकरणावरील निबंध (कृष्णशास्त्री चिपळूणकर)
२ भाषाशास्त्र (कृ. पां. कुळकर्णी)
३ महाराष्ट्रसारस्वत (भावे-तृतीयावृत्ति भाग १ ला व २ रा)
४ मराठी गद्याचा अिंग्रजी अवतार (द. वा. पोतदार)
५ अभिनव काव्यप्रकाश (रा. श्री. जोग)
६ छंदोरचना (मा. त्र्यं. पटवर्धन)

**प्रश्नपत्रिका ५ वी**

**निबंधलेखन—दोन निबंध**

प्रत्येक विद्यार्थ्याला दोन निबंध लिहावे लागतील. त्यांपैकीं निदान एक अभ्यासक्रमाशीं संलग्न असणाऱ्या विषयावर असेल व एक सर्वसामान्य स्वरूपाचा असेल. ही प्रश्नपत्रिका मोडी लिपींत लिहिली तरी चालेल.

---

## महाराष्ट्रसाहित्यपत्रिकेचीं पहिलीं आठ वर्षें

अर्थात्

## पत्रिकेच्या अंकांचीं वर्षशः बांधलेलीं आठ पुस्तकें

दर पुस्तकांत अभिप्राय, अैतिहासिक, चरित्र, निबंध, पुस्तकपरीक्षण, भाषिक शंकाचर्चा, सामाजिक इत्यादि विषयवार सदरें असून, सर्व मिळून महाराष्ट्र-भाषा, वाङ्मय, समाज, अितिहास यांसारख्या विविध क्षेत्रांतील नवीन विद्वत्ताप्रचुर विचार आणि माहिती मिळणार आहे.

किंमत—सुंदर कापडी बांधणी विषयसूचीसह. दर वर्षाच्या पुस्तकास ४ रुपये; परिषदेच्या सभासदांस २ रु. ट. ख. निराळा.

वि. सू.—नवव्या व दहाव्या वर्षांच्या पुस्तकांच्याहि बांधीव प्रती तयार आहेत. परंतु या प्रतींस प्रत्येकीं ४ रुपये पडतील.

चिटणीस, म. सा. परिषद्.

---

## 'मराठी भाषेचा व वाङ्मयाचा अितिहास'

### महानुभावअखेर

सदर ग्रंथ म. सा. परिषदेने मुद्दाम बक्षीस देअून लिहवून घेतला आहे. प्रसिद्ध साहित्यिक कै. बाळकृष्ण अनंत भिडे यांच्या सुरस लेखणींतून तो अुतरला असल्यामुळे त्याविषयी जास्त गौरवपर लिहिण्याची जरुरी नाही. विषयाच्या महत्त्वामुळे सदर ग्रंथ शाळा, कॉलेजें, वाचनालयें, महाराष्ट्रसाहित्य व भाषाभक्त या सर्वांनी अवश्य संग्रह करण्याजोगा आहे. पुस्तकाचा आकार रॉयल अष्टपत्री, पृष्ठें १२५, उत्तम बांधणी, किंमत फक्त अेक रुपया. परिषदेच्या सभासदांस व वर्गणीदारांस बारा आणे. ट. ख. वेगळा.

विशेष माहितीसाठी लिहा:—

चिटणीस,
म. सा. परिषद्, टिळक रस्ता, पुणें २

---

आर्यसंस्कृति मुद्रणालय, चिमणबाग, टिळकरस्ता, पुणें, येथे लक्ष्मण नारायण चाफेकर यांनी छापिलें व पुणें येथे महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या कार्यालयांत परिषदेकरिता ना. गो. चाफेकर यांनी प्रसिद्ध केलें.